गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते ।

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक १४ वें.

# चतुरगडच्या विनोदी स्त्रिया.

[ एक पांच अंकी प्रहसन. ]

हें

आंग्ल कवि शेक्सपियरच्या 'मेरी वाइव्हज् ऑफ वुइंडसर'

या पुस्तकाच्या आधारानें

**श्रीयुत पांडुरंग गंगाधर लिमये, बी. ए.,**

यांनीं लिहिलें.




[प्रथमावृत्ति.]

मुंबई,

**मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी.**

सपटेंबर १९०५.

## पात्रें.

**रावसाहेब मुकुंदराव.** एक लटपव्या गृहस्थ.

**विनायकराव.** एक सुखवस्तु गृहस्थ.

**रामभाऊ.** दुसरा एक सुखवस्तु गृहस्थ.

**गणपतराव.** एक सावकार.

**सोन्या.** गणपतरावांचा भाचा.

**व्यंकप्पा.** एक कानडा डाक्तर.

**गोविंदभटजी.** एक भिक्षुक.

**त्रिंबकराव.** विश्रांतिभवनाचा मालक.

**शंकरराव.** विनायकरावांचे मुलीचा शिक्षक.

**जगन्नाथ.**
**नीलकंठ.**
**नथू.** } मुकुंदरावाच्या पदरचे लफंगे लोक.

**सटव्या.** मुकुंदरावाचा चाकर.

**बाळू.** सोन्याचा चाकर.

**तान्ह्या.** व्यंकप्पाचा चाकर.

**मथुराबाई.** विनायकरावांची पत्नी.

**द्वारकाबाई.** रामभाऊंची पत्नी.

**कालिंदी.** विनायकरावांची मुलगी.

**सखू.** व्यंकप्पाचे चाकरीस असलेली एक बाई.

---

# चतुरगडच्या विनोदी स्त्रिया.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

[ स्थळ—विनायकरावांचे घरापुढील रस्ता. गणपतराव, सोन्या, गोविंदभटजी व बाळू प्रवेश करितात. ]

**गणपतराव**—तें कांहीं नाहीं, मी त्याच्यावर फिर्याद ठोकणारच! अहो गोविंदभटजी, तो मुकुंदराव मोठा रावसाहेब–नाहीं रावसाहेबाचा बाप असला, ह्मणून या गणपतरावाच्या वाटेस जाईल कीं काय? बाकी, त्यानें रावसाहेबी कशी मिळविली, हें तुह्मांला ठाऊकच आहे!

**गोविंदभटजी**—(स्वगत) आणखी आपण म्युनिसिपल कमिशनर कसे झालांत, हेंहि पण मी जाणून आहें!

**गणपतराव**—आह्मांला एक रावसाहेब हा किताब नसला, ह्मणून काय झालें? आह्मांला आपले लोक 'राजमान्य राजेश्री' ह्मणतात; अन् तीच आह्मी सर्वांत श्रेष्ठ पदवी समजतों.

**सोन्या**—मी ह्मणतों, श्रीमंत राजमान्य राजेश्री गणपतराव यांचा अपमान करणें, ह्मणजे काय?

**गणपतराव**—हो, श्रीमंत ह्मणायला कोणची हरकत आहे? आह्मांला नेहमीं पत्रेंबित्रें येतात, त्यांत 'श्रीमंत राजमान्य राजेश्री गणपतराव यांसी' असा मायना लिहिलेला असतो; आणि पत्त्यावरसुद्धां 'श्रीमंत राजमान्य राजेश्री गणपतराव यांसी प्रविष्ट व्हावें,' असें असतें, समजलांत?

**सोन्या**—कां, आतां कां गप्प बसलांत? कांहीं नाहीं तरी आज तीनशें वर्षें आह्मी आपल्या नांवामागें 'श्रीमंत' हा शब्द लावित आलों आहों. आमचे एकूनएक वंशज स्वताला श्रीमंत राजमान्य राजेश्री ह्मणवून घेत आले; आणि यापुढच्या पूर्वजांनांसुद्धां तसें करायला काय हरकत आहे? श्रीमंत राजमान्य राजेश्री गणपतराव, जी. आय्. पी. आ.—

**गणपतराव**—'जी. आय्. पी.' नव्हे; जे. पी., म्युनिसिपल कमिशनर—

**सोन्या**—हो; म्युनिसिपल कमिशनरसारख्यांची खोडी करणें, ह्मणजे काय?

**गणपतराव**—पहा तर खरें! आणखी हे आपले ह्मणत आहेत कीं, जाऊंद्या, त्यांत काय आहे!

**गोविंदभटजी**—माझें अजूनदेखील तेंच ह्मणणें आहे. मी असें समजतों कीं, लोकांनां सदुपदेश करणें, त्यांचे आपसांतले कलह मिटविणें, आणखी त्यांच्या मनांत एकमेकांबद्दल प्रेम उत्पन्न करणें, हें माझ्यासारख्या वैदिक ब्राह्मणाचें आदिकर्तव्य ह्मणजे 'ड्यूटी' आहे. ह्मणून ह्मणतों कीं, रावसाहेब मुकुंदराव यांनीं खरोखरच तुह्मांला राग येण्यासारखी कांहीं गोष्ट केली असली, तर त्यांची व तुमची पुन्हां 'फ्रेंडशिप्' ह्मणजे मैत्री जमवून देण्यासाठीं झटायला मी अगदीं तयार आहें.

**गणपतराव**—कांहीं जरूर नाहीं. मी त्याला कोर्टांत ओढून आणलाच ह्मणून समजा! कोर्टांची मदत अगदीं वस्स आहे. तुह्मांला काय सांगूं गोविंदभटजी, मी आतां अम्मळ थकलों हो, नाहींतर त्या ढेरपोट्याला कोठेंतरी एकटा गांठून चौदावें रत्न दाखविल्याशिवाय कद्धीं राहिलों नसतों!

**गोविंदभटजी**—( छातीवर हात मारून ) त्याच्याऐवजीं या रत्नाची योजना करा, ह्मणजे तुमच्या तंट्याचा निकाल लावून टाकतों. गर्वोक्ति करित नाहीं, पण, कमिशनरसाहेब, हा गोविंदभटजी ह्मणजे खरोखरच एक रत्न आहे, असें तुमच्या प्रत्ययाला आणून देईन. आपले विनायकराव आहेत ते? त्यांची एक मुलगी आहे कालिंदी ह्मणून; तुह्मांला ठाऊक असेलच?

**सोन्या**—कोण कालिंदी? तीच कीं नाहीं, चित्रें काढायला अन् गायला वाजवायला शिकते ह्मणून ह्मणतात ती?

**गोविंदभटजी**—हो, तीच. आहे कीं नाहीं सुरेख? अगदीं नक्षत्रासारखी आहे बुवा! तिच्या बापानें माझी अगदीं पाठ पुरविली आहे, कीं, पोरीला उत्तमसें स्थळ गांठून द्या ह्मणून. आपल्या सोनोपंतांचें नांव सुचवूं का त्यांनां?

**गणपतराव**—मुलगी सुरेख आहे ह्मटलेंत, नाहीं का?

**गोविंदभटजी**—कांहीं विचारूं नका! नुसता चिमखडा आहे, चिमखडा!

**गणपतराव**—बरें, हुंड्याचें मान कसें काय आहे? एकदोन बोटें?

**गोविंदभटजी**—होहो! तुह्मीं फारच ओढून धरलेंत तर तितकेंसुद्धां उकळतां येईल कदाचित्. कारण—तुह्मांला आपलें अंतस्थ सांगतों हो—कीं मुलीचा बाप जरी ती त्या व्यंकप्पा डाक्टरला द्यायची असें ह्मणत आहे, तरी आईच्या मनांतून ती तुमच्याच घरीं पडावी, असें फार आहे. तेव्हां तिकडला आग्रह पडला, ह्मणजे विनायकरावांची विवाहाच्या आणि हुंड्यापांड्याच्या

बाबतींतलीं मतें जागच्याजागीं जिरणार. कारण, त्यांच्या मनावर सुधारलेल्या विचारांबरोबरच अर्थात् 'बेटरहाफ'चें ह्मणजे अर्धांगीचें वर्चस्वदेखील वाजवीपेक्षां जरासें अधिक आहे. त्या अर्थीं तुह्मी मागाल तो हुंडा मिळेल. शिवाय विहिणींनां मनस्वी हौस आहे; तेव्हां पायघड्या न् रासन्हाणी न् हें न् तें न् तुह्मीं नको ह्मटलेंत तरी तुमच्यावर लादलेंच जाईल, म्हणून समजा. मग कसें काय, आहे मनांत ?

**गणपतराव**—आह्मीसुद्धां मुलीच्या शोधांतच आहोंत. ही मुलगी एकदा नजरेखालीं घालून ठेवूं पाहिजे तर.

**गोविंदभटजी**—मग उशीर कां ? अनायासें आपण त्यांच्या घरावरूनच जात आहों; तेव्हां मुलगी पाहूनच पुढें चला, ह्मणजे झालें ?

**गणपतराव**—बरें, चला पाहिजे तर. अलीकडे मुलांनीं बायको पसंत करण्याची चाल पडत चालली आहे; तेव्हां आतां गेलों ह्मणजे ती अनायासें या सोन्याच्याहि दृष्टीस पडेल. पण कायहो, मुकुंदराव आतां त्यांच्याकडे आले असतील, नाहीं ?

**गोविंदभटजी**—होय ह्मणून सांगूं, का नाहीं ह्मणून सांगूं, का मला माहिती नाहीं ह्मणून सांगूं ? मला बुवा असत्य भाषण करणें मुळींच रुचत नाहीं. खोटें बोलणाराचा मला मनापासून 'अँग्री' येतो. खरें ह्मणाल तर, रावसाहेब मुकुंदराव हे यावेळीं विनायकरावांच्याच घरीं आहेत. मात्र तेथेंच कांहीं अधिक-उणा प्रसंग आणूं नका बरें. ( पुढें होऊन ) दार उघडा हो, दार.

**विनायकराव**—( पडद्यांत ) कोण आहे ? ( प्रवेश करितो. )

**गोविंदभटजी**—हे गणपतराव आणि त्यांचे भाचे आले आहेत आपल्याकडे.

**विनायकराव**—यावें कमिशनरसाहेब ! कसें काय ? बरे वेळेवर आलांत. अरे कोण आहेरे ? आणखी दोनतीन ताटें जास्ती करा ह्मणावें.

**गणपतराव**—नको, नको; कशाला ?

**विनायकराव**—पण नुसता चहातरी घ्याल कीं नाहीं ?

**गणपतराव**—छे, कांहींसुद्धां नको.

**विनायकराव**—भलतेंच ? चहाला कोणीं नको ह्मटलें आहे का ? अहो, आजकाल पुरुषांचें सौभाग्य तें ! स्त्रियांनां जसें कुंकू, तसा पुरुषांनां चहा होऊन बसला आहे. आपल्या घरीं कोणी केव्हांहि आलें, तरी त्याच्यापुढें चहा हा केलाच पाहिजे, आणि त्यानें तो घेतलाच पाहिजे.

**गणपतराव**—बरें बुवा, मी कांहीं आपल्या ह्मणण्याबाहेर नाहीं.

**गणपतराव**—पहा तर खरें! आणखी हे आपले ह्मणत आहेत कीं, जाऊंद्या, त्यांत काय आहे!

**गोविंद्भटजी**—माझें अजूनदेखील तेंच ह्मणणें आहे. मी असें समजतों कीं, लोकांनां सदुपदेश करणें, त्यांचे आपसांतले कलह मिटविणें, आणखी त्यांच्या मनांत एकमेकांबद्दल प्रेम उत्पन्न करणें, हें माझ्यासारख्या वैदिक ब्राह्मणाचें आदिकर्तव्य ह्मणजे 'ड्यूटी' आहे. ह्मणून ह्मणतों कीं, रावसाहेब मुकुंदराव यांनीं खरोखरच तुह्मांला राग येण्यासारखी कांहीं गोष्ट केली असली, तर त्यांची व तुमची पुन्हां 'फ्रेंडशिप्' ह्मणजे मैत्री जमवून देण्यासाठीं झटायला मी अगदीं तयार आहें.

**गणपतराव**—कांहीं जरूर नाहीं. मी त्याला कोर्टांत ओढून आणलाच ह्मणून समजा! कोर्टाची मदत अगदीं बस्स आहे. तुह्मांला काय सांगूं गोविंदभटजी, मी आतां अम्मळ थकलों हो, नाहींतर त्या ढेरपोट्याला कोठेंतरी एकटा गांठून चौदावें रत्न दाखविल्याशिवाय कधीं राहिलों नसतों!

**गोविंद्भटजी**—( छातीवर हात मारून ) त्याच्याऐवजीं या रत्नाची योजना करा, ह्मणजे तुमच्या तंट्याचा निकाल लावून टाकतों. गर्वोक्ति करित नाहीं, पण, कमिशनरसाहेब, हा गोविंदभटजी ह्मणजे खरोखरच एक रत्न आहे, असें तुमच्या प्रत्ययाला आणून देईन. आपले विनायकराव आहेत ते? त्यांची एक मुलगी आहे कालिंदी ह्मणून; तुह्मांला ठाऊक असेलच?

**सोन्या**—कोण कालिंदी? तीच कीं नाहीं, चित्रें काढायला अन् गायला वाजवायला शिकते ह्मणून ह्मणतात ती?

**गोविंद्भटजी**—हो, तीच. आहे कीं नाहीं सुरेख? अगदीं नक्षत्रासारखी आहे बुवा! तिच्या बापानें माझी अगदीं पाठ पुरविली आहे, कीं, पोरीला उत्तमसें स्थळ गांठून द्या ह्मणून. आपल्या सोनोपंतांचें नांव सुचवूं का त्यांनां?

**गणपतराव**—मुलगी सुरेख आहे ह्मटलेंत, नाहीं का?

**गोविंद्भटजी**—कांहीं विचारूं नका! नुसता चिमखडा आहे, चिमखडा!

**गणपतराव**—बरें, हुंड्याचें मान कसें काय आहे? एकदोन बोटें?

**गोविंद्भटजी**—होहो! तुह्मीं फारच ओढून धरलेंत तर तितकेंसुद्धां उकळतां येईल कदाचित्. कारण—तुह्मांला आपलें अंतस्थ सांगतों हो—कीं मुलीचा बाप जरी ती त्या व्यंकप्पा डाक्टरला द्यायची असें ह्मणत आहे, तरी आईच्या मनांतून ती तुमच्याच घरीं पडावी, असें फार आहे. तेव्हां तिकडचा आग्रह पडला, ह्मणजे विनायकरावांची विवाहाच्या आणि हुंड्यापांड्याच्या

बाबतींतलीं मतें जागच्याजागीं जिरणार. कारण, त्यांच्या मनावर सुधारलेल्या विचारांबरोबरच अर्थात् 'बेटरहाफ'चें ह्मणजे अर्धांगीचें वर्चस्वदेखील वाजवीपेक्षां जरासें अधिक आहे. त्या अर्थीं तुह्मी मागाल तो हुंडा मिळेल. शिवाय विहिणींनां मनस्वी हौस आहे; तेव्हां पायघड्या न् रासन्हाणी न् हें न् तें न् तुह्मीं नको ह्मटलेंत तरी तुमच्यावर लादलेंच जाईल, म्हणून समजा. मग कसें काय, आहे मनांत ?

**गणपतराव**—आह्मीसुद्धां मुलीच्या शोधांतच आहोंत. ही मुलगी एकदा नजरेखालीं घालून ठेवूं पाहिजे तर.

**गोविंदभटजी**—मग उशीर कां ? अनायासें आपण त्यांच्या घरावरूनच जात आहों; तेव्हां मुलगी पाहूनच पुढें चला, ह्मणजे झालें ?

**गणपतराव**—बरें, चला पाहिजे तर. अलीकडे मुलांनीं बायको पसंत करण्याची चाल पडत चालली आहे; तेव्हां आतां गेलों ह्मणजे ती अनायासें या सोन्याच्याहि दृष्टीस पडेल. पण कायहो, मुकुंदराव आतां त्यांच्याकडे आले असतील, नाहीं ?

**गोविंदभटजी**—होय ह्मणून सांगूं, का नाहीं ह्मणून सांगूं, का मला माहिती नाहीं ह्मणून सांगूं ? मला बुवा असत्य भाषण करणें मुळींच रुचत नाहीं. खोटें बोलणाराचा मला मनापासून 'अँग्री' येतो. खरें ह्मणाल तर, रावसाहेब मुकुंदराव हे यावेळीं विनायकरावांच्याच घरीं आहेत. मात्र तेथेंच कांहीं अधिक-उणा प्रसंग आणूं नका बरें. ( पुढें होऊन ) दार उघडा हो, दार.

**विनायकराव**—( पडद्यांत ) कोण आहे ? ( प्रवेश करितो. )

**गोविंदभटजी**—हे गणपतराव आणि त्यांचे भाचे आले आहेत आपल्याकडे.

**विनायकराव**—यावें कमिशनरसाहेब ! कसें काय ? बरे वेळेवर आलांत. अरे कोण आहेरे ? आणखी दोनतीन ताटें जास्ती करा ह्मणावें.

**गणपतराव**—नको, नको; कशाला ?

**विनायकराव**—पण नुसता चहातरी घ्याल कीं नाहीं ?

**गणपतराव**—छे, कांहींसुद्धां नको.

**विनायकराव**—भलतेंच ? चहाला कोणीं नको ह्मटलें आहे का ? अहो, आजकाल पुरुषांचें सौभाग्य तें ! स्त्रियांनां जसें कुंकूं, तसा पुरुषांनां चहा होऊन बसला आहे. आपल्या घरीं कोणी केव्हांहि आलें, तरी त्याच्यापुढें चहा हा केलाच पाहिजे, आणि त्यानें तो घेतलाच पाहिजे.

**गणपतराव**—बरें बुवा, मी कांहीं आपल्या ह्मणण्याबाहेर नाहीं.

**विनायकराव**—आतां कसें ठीक बोललांत ! सांगितलें कारे आणखी चहा आणि ताटें तयार करायला ? कां सोनोपंत, कसं काय ? ठीक आहेना ?

**सोन्या**—हो, खुशाल आहों.

**गणपतराव**—कायहो विनायकराव, मुकुंदराव इकडे आले होते, ते कुठें आहेत ?

**विनायकराव**—ते तिकडे आहेत आंतमध्यें. मला जर आपलें दोघांचें सख्य करतां आलें, तर मोठी बहार होईल.

**गोविंदभटजी**—वाः ! किती सज्जनपणाचें भाषण हें !

**गणपतराव**—विनायकराव, त्यांनीं आमचा मोठा गुन्हा केला आहे.

**विनायकराव**—पण तो ते कबूल करित आहेत ना ?

**सोन्या**—नुसता गुन्हा कबूल केल्यानें त्याचें प्रायश्चित्त संपतें, असें थोडेंच आहे ! त्यांनीं गुन्हा केला आहे; खरोखरच त्यांनीं मोठा गुन्हा केला आहे; खोटें नाहीं. श्रीमंत राजमान्य राजेश्री गणपतराव सावकार म्युनिसिपल कमिशनर साहेब यांचा मुकुंदरावांनीं गुन्हा केला आहे, गुन्हा !

**विनायकराव**—हे पहा तेच आले.

( मुकुंदराव, जगन्नाथ, नीलकंठ व नथू प्रवेश करितात. )

**मुकुंदराव**—कांहो कमिशनरसाहेब, तुह्मी आमच्यावर फिर्याद लावणार आहां ह्मणे ?

**गणपतराव**—अलबत रावसाहेब ! कारण, तुह्मी आमच्या मळ्यांत शिरलांत, तेथलीं फळें तोडलींत, माळीण नको ह्मणाली ह्मणून तिला मारलीत, आणखी आमची निंदा केलीत, नाहीं का ?

**मुकुंदराव**—काय ह्मणतां ! तुमची निंदा केली, तुमच्या मळ्यांत शिरलों, तेथलीं फळें खाल्लीं, आणखी—हो ! माळणीला मारली, आणखी नाहींना कांहीं केलें ?

**गणपतराव**—रावसाहेब, थट्टा नाहीं लागली. आह्मी विचारतों याचा जबाब द्यावा लागेल.

**मुकुंदराव**—एवढेंचना ? एका शब्दांत जबाब ! मीं या साऱ्या गोष्टी केल्या. जबाबाला हो काय उशीर ?

**गणपतराव**—आह्मी ही सर्व हकीगत कोर्टापुढें मांडणार.

**मुकुंदराव**—आणखी आपली टर उडवून घेणार !

**गोविंदभटजी**—( स्वगत ) खेटरें उडवलीं पाहिजेत याच्या थोबाडावर. ( उघड ) काय, बेततरी काय आहे तुमचा ?

**मुकुंदराव**—बेत आहे शिरापुरीचा. लोकांची तब्यत पाहून मग तुह्मी त्यांनां उपदेश करित जा. कायहो सोन्याजीराव, तुमचा नाहींका फिर्याद करायचा विचार ? तुह्मालांहि म्हणे परवां थोडा खाऊ मिळाला आहे !

**सोन्या**—त्याच खाऊचा मासला तुह्मांला आणि हे भामटे ठक रामोशी आहेत यांनां पोलिसमार्फत द्यायचा माझा विचार आहे. ह्या गुलामांनीं मला शिवरात्रीच्या दिवशीं आग्रह करकरून दुधांतून भांग पाजली; आणखी मी तारेंत आल्यावर माझ्या जाकिटांतलें पैशाचें पाकिट, आणखी घड्याळाचें लाकिट लांबवलें.

**जगन्नाथ**—फारशी जीभ लांबवित आहां हो लांबटांगे ?

**सोन्या**—तुमचे कानसुद्धां लांबवीन लवकरच, तुह्मी काय समजलां आहांत ? माझ्या जाकिटांतलें पाकिट आणि लाकिट लांबवलेंत का नाहीं, बोला अगोदर ?

**नथू**—जाकिट, पाकिट, लाकिट ! काय किटकिट आहे बुवा ?

**सोन्या**—कांहीं हरकत नाहीं; चालूंद्या.

**नीलकंठ**—अरे वारे मरकट्ट ! ह्मणे कॅही हॅरकद्द नाहीं ! आह्मांला अगदीं साफ दम देतो आहे !

**गोविंदभटजी**—उगीच बसारे; मी ह्मणतों तें ऐका. या बाबतींत आपण तिघे 'अंपायर' नेमूं. नंबर वन्, हे सुखवस्तु गृहस्थ मिस्तर विनायकराव. नंबर टू, अस्मादिक ह्मणजे 'राइट रेव्हरन्ड डॉक्टर' गोविंदभटजी, आणि नंबर थ्री, ह्मणजे तिसरे, ह्मणजे अखेरचे, आपले मिस्तर त्रिंबकराव एस्कायर विश्रांति-भवनवाले.

**विनायकराव**—आपण तिघे मिळून यांचा तंटा मिटवून टाकूं.

**गोविंदभटजी**—फार उत्तम आहे. सध्या मी आपल्या डायरींत याबद्दल नोटिस करून ठेवतों. मग 'केअरफुली' विचार करून कायतो निकाल लावून टाकूं.

**मुकुंदराव**—नथ्या, ए नथ्या,

**नथू**—ऐकतों आहें.

**मुकुंदराव**—कायरे, तूं या सोनूअप्पांच्या जाकिटांतलें पाकिट लाटलेंस का ?

**सोन्या**—तुमच्या गळ्याशपथ लाटलें. त्यांत माझ्या दोन चवल्या, एक ढब्बू पैसा, आणखी एक दुगाणी होती. अगदीं माझ्या पायाशपथ होती.

**मुकुंदराव**—खरें कारे हें ?

**गोविंदभटजी**—तो कशाला हो ह्मणतो आहे ?

**नथू**—अहो भटजीबुवा, आपण जे आहेत्ते गप्प बसा ! हे सुदामदेव ह्मणत आहेत तें मुळींच खरें नाहीं. खऱ्यांत आणि यांच्या ह्मणण्यांत बिलकूल मेळ नाहीं. किंवा थोडक्यांत सांगतों कीं, यांचें ह्मणणें निवळ खोटें आहे; ह्मणजे हे खोटें बोलत आहेत. मला हो यांच्या पाकिटाशीं काय करायचें आहे ?

**सोन्या**—तर मग यानें लाटलें तें. भटजींची शपथ यानें लाटलें.

**नीलकंठ**—कोणाचें नांव घेतां हो फक्कड ? जरा संभाळून बोला बरें का ? तुमचें लाकिट मीं साफ लाटलें नाहीं.

**सोन्या**—तूं नाहींस ? तर मग हा लालतोंड्याच चोर असला पाहिजे. भांगेच्या धुंदींतल्या साऱ्या गोष्टी मला स्पष्टपणें आठवत नसल्या ह्मणून काय झालें ? मी कांहीं नुसता गाढव नाहीं कांहीं !

**जगन्नाथ**—नाहींस खरा, आणखीहि पुढचा आहेस !

**मुकुंदराव**—कायरे, तुझें याच्यावर काय ह्मणणें आहे ?

**जगन्नाथ**—मला एवढें ठाऊक आहे कीं, ही स्वारी अगदीं तर्रर झाली होती; अर्थात् विचाराच्या कामांत फत्तर बनली होती; अर्थात् नंतरच्या गोष्टी समजण्याइतकी शुद्धि याच्या डोक्यांत नव्हती.

**सोन्या**—असें काय ? कांहीं हरकत नाहीं. पुन्हा मी तुमच्यासारख्या हरामखोरांबरोबर भांगेचा थेंब घेणार नाहीं. पाहिजेतर या भटजींच्यासारख्या देवभोळ्या, धार्मिक आणि पवित्र माणसांबरोबर भांडींचीं भांडीं घशाखालीं ओतीन; पण तुमच्याबरोबर ह्मणून—अगदीं सांभाचें नांव !

**गोविंदभटजी**—( स्वगत ) सांभाच्या पुढलाच आहेस तूं ! ( उघड ) तुमचा निश्चय अगदीं स्तुत्य आहे.

**मुकुंदराव**—पहा बुवा, मी यांनां तुमच्यासमक्ष खरीखुरी हकीगत विचारली; पण ते अगदींच कानाला हात लावित आहेत.

( इतक्यांत कालिंदी प्रवेश करिते. )

**कालिंदी**—तयारी झाली आहे.

**सोन्या**—( स्वगत ) आय् हाय् ! हीच ती कालिंदी !!

**विनायकराव**—ठीक आहे, हे आलोंच आह्मी. चला, मंडळी चला. आपापलें वैमनस्य चहांत बुडवून टाका.

[ गणपतराव, सोन्या, गोविंदभटजी व बाळू यांखेरीज सर्व जातात.

**सोन्या**—( स्वगत ) छे बुवा! आज मी आपला जरीचा रुमाल आणि जरीबुट्यांचें जाकिट घालून आलों असतों तर बरें झालें असतें!

**गणपतराव**—अरे चल सोन्या, चल. आह्मी खोळंबलों आहों तुझ्यासाठीं. हें बघ सोन्या, या भटजींनीं तुझी जणूं काय मागणीच केली आहे; आडून आडून मागणीच केली आहे ह्मणेनास! काय समजलास?

**सोन्या**—असें जर असेल तर योग्य दिसेल तें करायला मी तयार आहें.

**गणपतराव**—पण माझें ह्मणणें तर ऐकून घेशील?

**सोन्या**—समजलों, समजलों.

**गोविंदभटजी**—अहो समजलों समजलों काय? ते काय सांगत आहेत तें लक्ष्यपूर्वक ऐकून घ्या? मग मीहि या बाबतींत तुह्मांला कांहीं सांगणार आहें.

**सोन्या**—माफ करा. तुमच्यापेक्षां मला मामांचें सांगणें अधिक मान्य आहे. कारण ते म्युनिसिपल कमिशनर आहेत; तसे तुह्मी थोडेच आहांत?

**गोविंदभटजी**—मी कुठें ह्मणतों आहें ह्मणून? पण तो मुद्दा नाहीं. मुद्दा आहे तुमच्या लग्नाचा.

**गणपतराव**—बरोबर.

**गोविंदभटजी**—यस्. तुमचें आणि कालिंदीचें लग्न हाच प्रस्तुत विषय आहे.

**सोन्या**—कांहीं हरकत नाहीं. ती जर आह्मांला योग्य शर्तींवर मिळत असेल, तर आमची तयारी आहे.

**गोविंदभटजी**—तयारी असेल हो; पण ती तुह्मांला प्यारी आहे का? अगोदर या प्रश्नाचें तुह्मी आपल्या तोंडानें किंवा ओंठांनीं उत्तर द्या. तुह्मांला ठाऊक आहे का? ओंठ हे तोंडाचेच भाग आहेत किंवा नाहीं, याबद्दल हल्लीं चायनाच्या डाक्तरलोकांत मोठा कडाक्याचा वाद ह्मणजे 'कांट्रोव्हर्सि' माजून राहिली आहे. पण असो; त्याच्याशीं आपल्याला काय करायचें आहे? आधीं तुमच्या हृदयांत कालिंदीसाठीं थोडीतरी जागा आहे का नाहीं, तें कळूंद्या.

**गणपतराव**—हं, बोल बाबा सोन्या, बोल. तिच्यावर तुझें प्रेम आहे का?

**सोन्या**—तसें करणें जर योग्य दिसत असेल, तर मी तिच्यावर प्रेम करीन.

**गोविंदभटजी**—भविष्यकाळ नको आहे. सध्या तुह्मी तिला 'लव्ह' करतां आहां का ?

**गणपतराव**—ती तुला आवडलीच पाहिजे. हुंडाबिंडा यथास्थित मिळाला तर तूं तिला वरशील कीं नाहीं ?

**सोन्या**—तुह्मीं पाहिजे तें सांगितलेंत, तरी मी करीन. मात्र तें योग्य असलें पाहिजे हो.

**गणपतराव**— अरे ऐकून तर घे. समजलास कीं नाहीं सोन्या, मी जें काय करित आहें तें तुझ्या बऱ्यासाठींच करित आहें. मुलगी तुला पसंत आहे का?

**सोन्या**—तुमचा आग्रहच असला तर मी तिला पत्करतों. बाकी प्रेमाविषयीं ह्मणाल, तर आज तिच्यावर माझें तितकें प्रेम नसलें ह्मणून काय झालें ? जसजशी आमची जास्त ओळख होत जाईल, आणखी एकमेकांचे स्वभाव समजूं लागतील, तसतशी ती मला जास्त आवडूं लागेल. 'अतिपरिचयादवज्ञा' ह्मणतात तें का उगीच ? तुमचें सांगणें असलें तर मी आपला तिच्याशीं लग्नाला उभा रहातों. बस्स, ठरला आमचा हट्ट.

**गोविंदभटजी**—काय पोक्त विचाराचा जबाब आहे ! मात्र 'निश्चय' शब्द केव्हां वापरायचा, आणि 'हट्ट' केव्हां वापरायचा, हें यांच्या नीटसें लक्ष्यांत आलें नाहीं अजून.

**गणपतराव**—शब्दांत काय आहे हो मोठेंसें ? आपल्याला फक्त त्यांतला मतलब घ्यायचा. ही पहा कालिंदी आली.

( कालिंदी पुनः प्रवेश करते. )

**गणपतराव**—कांग, पुन्हा कशाला आलीस ?

**कालिंदी**—पानं वाढून ठेवलीं आहेत, आणखी चहा निवून चालला आहे. बाबांनीं लवकर बोलावलं आहे.

**गणपतराव**—बरें आलोंच आह्मी. चला; भटजी, सोन्या, चला.

**गोविंदभटजी**—आलों. बाकी आतां कांहीं उदक सोडायचें नाहीं, कांहीं नाहीं. तेव्हां मला उशीर झाला तरी चालेल.

[ गणपतराव व गोविंदभटजी जातात.

**कालिंदी**—चलायचं होतं ह्मटलं.

**सोन्या**—नको नको; खरोखरच नको.

**कालिंदी**—मंडळी वाट पहात बसली आहे.

**सोन्या**—पण मला भूक नाहीं; अगदीं भूक नाहीं. खरोखरच नाहीं. (बाळूस उद्देशून) कायरे ए–इथें काय उभा राहिला आहेस ठोंब्यासारखा ? जा बाहेर देवडीवर जाऊन बैस जा. (कालिंदीस) सध्या कीं नाहीं, आमच्या घरीं एक ब्राह्मण आणि दोन गडी एवढेच नोकर आहेत. आमची आई जास्त माणसें ठेवूंच देत नाहीं. पण ती एकदा मेली, ह्मणजे मी हल्लींच्या तिप्पट चाकर लोक ठेवणार आहें.

**कालिंदी**—उशीर होत आहे, फराळाला यायचंना आंत ?

**सोन्या**—नको नको. मी आपला इथेंच बसतों. परवां एक दिवस मी विटीदांडू खेळत असतांना माझ्या गुडघ्यावर विटी लागली. तेव्हांपासून मला चहाचा वास मुळींच सोसेनासा झाला आहे. अरे इच्या ! हीं कुत्रीं कां एवढीं भुंकत आहेत बुवा ? का दिवसाढवळ्या चोरबीर आले आहेत कुठें आसपास ? गेल्या दोनतीन महिन्यांत चोरांनीं काय धुमाकूळ मांडला होता ! तुह्मांला चोरांची फार भीति वाटत असेल नाहीं ? मलातर बुवा चोर न् दरोडेखोर आले आहेत असें समजलें कीं भलताच आनंद होतो; आणि मग अंगांत जें अवसान चढतें, कांहीं पुसूं नका. मोठी शिकार आली, असें वाटतें. आमच्या घरीं चोरी झाली तेव्हां मीं त्या चोरांनां पकडून बेदम करून टाकलें असतें; पण काय करावें, मी जागाच झालों नाहीं. बायकांनां चोरांचें भय वाटायचेंच. कारण चोर ह्मणजे —चोरच ते !

(विनायकराव प्रवेश करितात.)

**विनायकराव**—अहो चला सोनोपंत, चला. तुह्मींतर जांवयासारखेंच अडवून धरलें आहे ! आह्मी सगळे तिष्ठत बसलों आहों तुमच्यासाठीं.

**सोन्या**—माफ करा बुवा. मला अगदीं अन्नत्वेष आला आहे.

**विनायकराव**—तें कांहीं चालायचें नाहीं. तुह्मांला एक घांसभरतरी खाल्लेंच पाहिजे.

**सोन्या**—बरें आहे, येतों न् काय ?

[ सर्व जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ स्थळ—रस्ता. गोविंदभटजी व बाळू प्रवेश करितात. ]

**गोविंद्भटजी**—अरे ए बाळू, तुला त्या कानड्या व्यंकप्पा डाक्तरचें घर ठाऊक आहेना ?

**बाळू**—व्हय्. कुटसां हाय् त्यें ?

**गोविंद्भटजी**—अरे लेका ! ठाऊक आहे ह्मणतोस अन् कुठेंसें आहे ह्मणूनहि विचारतोस ?

**बाळू**—ठाव व्हतां, पर ध्येनामंदी ऱ्हायलां न्हाय.

**गोविंद्भटजी**—अरे त्यांच्या दवाखान्याजवळच आहे.

**बाळू**—व्हयव्हय, आतां आल ध्येनामंदी. पर दवाखाना कुटसा हाय ?

**गोविंद्भटजी**—तूंतर मला अगदीं गाढवच दिसतोस ! दवाखाना अगदीं घराजवळच आहे त्यांच्या.

**बाळू**—मला दोनीवबी दक्कल न्हाइत.

**गोविंद्भटजी**—अरे मूर्खा, जवळजवळच आहेत अगदीं. हें घर, आणि हा दवाखाना, समजलास ? कनकपुऱ्यांतील तें फीमेल हायस्कुल पाहिलें आहेस कीं नाहीं ?

**बाळू**—व्हय व्हय. कागुज टाकाया मी दररोज जातों की थत.

**गोविंद्भटजी**—अरे मूर्खा, तें पोस्टऑफिस ! त्याच्या जरासें पुढें आहे.

**बाळू**—बरां, मी हुडकूनशी काढतां.

**गोविंद्भटजी**—तेथें ती सखूबाई ह्मणून आहे ती ? ती त्यांची सैंपाकीण, बाजारमास्तरीण, मंडईकरीण, परटीण, शिंपीण, सुईण सगळी कांहीं ती आहे. तिच्याकडे जा.

**बाळू**—जातां. ( जाऊं लागतो. )

**गोविंद्भटजी**—चाललास कुठें ? 'फूल !' कालिंदीच्या लहानपणीं ती विनायकरावांच्या घरीं फार दिवस कामाला होती. तेव्हांपासून कालिंदीवर तिची फार भक्ति आहे, आणि कालिंदीलाहि तिचा फार लळा आहे. तिला हें पत्र नेऊन दे जा. तुझ्या यजमानांच्यावद्दल कालिंदीजवळ दोन शब्द बोल, असें यांत लिहिलेलें आहे तिला. पत्र नीट तिच्या हवालीं कर हो ? जा.

[ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थळ—विश्रांतिभवन. मुकुंदराव, त्रिंबकराव, जगन्नाथ, ]
नीलकंठ, नथू, सटव्या वगैरे बसले आहेत. ]

**मुकुंदराव**—अहो तुम्ही त्रिंबकराव ?

**त्रिंबकराव**—काय म्हणतां हो मेहेरबान ?

**मुकुंदराव**—तुम्हांला काय सांगूं त्रिंबकराव, मला आपल्या पदरचे कांहीं लोक कमी करायची पाळी आली आहे बुवा !

**त्रिंबकराव**—मग होऊन जाऊंद्या न् काय ! टाका कमी करून. द्या त्यांनां निरोप. बडतर्फ करून टाका. व्हा म्हणावें चालते.

**मुकुंदराव**—अहो, दरमहाचा माझा शंभरदीडशें रुपयांचा खर्च आहे कमींत कमी !

**त्रिंबकराव**—मग तुम्हांला काय कमी आहे ? तुम्ही राजे आहांत. महाराजे, नवाब, निजाम, बादशहा, झार, व्हाइसराय आहांत तुम्ही ! पण खरोखरच जर तुम्ही आपल्या लोकांनां काढून टाकणार असलांत, तर मी या जग्याला ठेवतों आचाऱ्यावाढप्याचें काम करायला. काय ? आहे पसंत ?

**मुकुंदराव**—हो, ठेवाच तुम्ही त्याला आपल्या इथें.

**त्रिंबकराव**—ठेवतों म्हणून सांगितलें ना एकदा ? हं, चल बुवा, चल बघूं तुझ्या अंगची शैली. [ त्रिंबकराव जातात.

**मुकुंदराव**—जातोसनारे ? बेट्या तुझें नशीब, म्हणून तुला ही आचाऱ्या-वाढप्याची नोकरी आयती वाहून आली. आतां सैंपाकघरांत सारें तुझें राज्य; हवें तें करावें आणि गिळावें.

**जगन्नाथ**—माझ्या मनांत एकदा हाहि धंदा धरून पहायचें होतें. ह्यांत आपण चैन मारणार. [ जातो.

**नथू**—जा लेका, तूं आतां जे आहेत्ते पाकाध्यक्ष ऊर्फ झारेकरी होणारन् काय ?

**नीलकंठ**—हे भंगड, आतां श्री भांग्याम्हसोबाच्या अध्यक्षतेखालीं भरणाऱ्या दरबारचे साफ मेंबर झाले म्हणायचे !

**मुकुंदराव**—ही ब्याद एकदाची सुटली, फार चांगलें झालें. त्याच्या चोऱ्या फारच उघड हो ! बेट्याच्या उचलेपणांत शिताफी कशी ती नाहींच! शिवाय त्याला वेळवखत कांहीं समजत नाहीं. वेळेस सगळ्यांनांच गोत्यांत अणायाचा.

**नीलकंठ**—बोलतां बोलतां डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्या अवकाशांत साफ भामटेगिरी करणें, यांतच खरा चौर्यार्थ आहे.

**नथू**—भामटेगिरी? कसला शब्द वापरलास ? अरे गुणग्राही लोक जे आहेत्ते त्याला हातचलाखी असें ह्मणतात!

**मुकुंदराव**—बरें, कायरे बेट्यांनों, माझ्या थैलीला तर अगदीं शोष पडला आहे; मग करें काय?

**नथू**—मग तिला थोडें शिक्के मारलेलें सुवर्ण द्या न् काय ?

**मुकुंदराव**—द्या कुठलें ? अक्कल लढवून कांहींतरी शक्कल काढली पाहिजे बुवा! कोणालातरी खड्डयांत आणलें पाहिजे लवकर.

**नथू**—त्याशिवाय गत्यंतर नाहीं. नाहींतर आमचें पोटतरी कसें चालणार?

**मुकुंदराव**—तो रामभाऊ तुमच्या माहितीचा आहे का?

**नथू**—तो प्राणी मला ठाऊक आहे. एक लक्षाची असामी आहे.

**मुकुंदराव**—हेंसुद्धां तुला ठाऊक आहेना? मग मला एक युक्ति सुचली आहे. सांगूं माझ्या डोक्यांत काय आहे तें ?

**नथू**—बटाटे कीं नाहीं ? तेंसुद्धां मला ठाऊक आहे.

**मुकुंदराव**—हें पहा, ही थट्टेची वेळ नव्हे. हा पठ्ठया त्या रामभाऊच्या गृहस्थीशीं संधान जुळवणार आहे आतां. तिच्या नखऱ्यांवरून, तिच्या वर्तनावरून, आणखी एकंदर बोलण्याचालण्यावरून माझ्या असें होऱ्यांत आलें आहे कीं, ती अस्मादिकांवर फिदा झाली आहे.

**नथू**—खूप आहे बुवा!

**मुकुंदराव**—तिच्या शृंगारचेष्टांचा मी थोडक्यांत असा अर्थ करतों कीं, 'रावसाहेब मुकुंदराव, मी सर्वस्वी तुमची आहें.' आह्मीं तिचें मनोगत ताडलें.

**नीलकंठ**—पण ती तुमचें मानगुट साफ तोडील हो वेळेस! संभाळा.

**मुकुंदराव**—मग माझ्या या गलेलठ्ठ मनगटांत जोर नाहीं वाटतें ?

**नथू**—अरे इच्या! मनोगट, मानगुट, मनगट, ही शुद्ध वटवट आहे, असें मी समजतों. तरी पण न जाणों! हे आहेत मनकवडे, तेव्हां त्या बाईच्या मनोगताचा कवडसा यांच्या मेंदूवर पडलाहि असेल!

**नीलकंठ**—पण ती यांच्यावर फिदा असल्यानें आपल्याला एक कवडीचा तरी लभ्यांश कसा होणार, हें मी साफ अजून समजलों नाहीं!

**मुकुंदराव**—रामभाऊच्या घरांतला सर्व कारभार त्याची गृहस्थीच पहाते. तिजोरीच्या किल्ल्याबिल्ल्या सारें तिच्याजवळच असतें. नवरा तिला कधीं हिशोबठिशोबदेखील विचारित नाहीं. आणि तीहि पण नवऱ्याला विचारित नाहीं! अरे या अलीकडच्या, लिहिणेंवाचणें शिकलेल्या चारगट बायका, यांचे काय घेऊन बसलां ? तिचें मन माझ्या लक्ष्यांत आलें आहे; आणि माझें मन तिच्या लक्ष रुपयांवर गेलें आहे. मात्र ती आपल्या लक्षांतले कांहीं रुपये मला देईल, तेव्हांच मी आपलें लक्ष्य तिच्या ह्मणण्याकडे देणार. आतां समजलास ?

**नथू**—समजलों; पण तुह्मी कांहीं तिच्या फारसे भरीस पडूं नका बुवा !

**मुकुंदराव**—भलतेंच ! उलट तिच्याजवळचे फारसे नाहीं थोडेसे रुपये तरी मी माझ्या थैलीच्या भरीस पाडणार. ही पहा, मीं तिला एक प्रणयपत्रिका लिहिली आहे. आणखी त्या विनायकरावाची गृहस्थी मथुराबाई, तिच्या नांवची ही दुसरी एक लिहिली आहे. आतां मी विनायकरावाच्या घरीं गेलों होतों, तेव्हां काय सांगूं तुह्मांला, तिनें मला डोळे मारमारून बेजार करून सोडलें पहा ! ती आपल्या पाणीदार आणि तेजस्वी डोळ्यांनीं आमच्या या भव्य मुद्रेकडे आणि अगडबंब पोटोबाकडे सारखी टक लावून पहात होती.

**नथू**—मग जे आहेत्ते उकिर्ड्यांवर सूर्य प्रकाशला ह्मणायचा ?

**नीलकंठ**—अगदीं साफ !

**मुकुंदराव**—अरे, काय सांगूं तुह्मांला ? ती आपल्या भुकेल्या दृष्टीनें माझे एकेक अवयव असे कांहीं निरखून निरखून पहात होती कीं, मला वाटलें ही आतां आपल्या डोळ्यांनीं मला शोषून घेणार ! हें पहा, मीं तिला उद्देशून लिहिलेलें पत्र. तीसुद्धां पैशानें खूप गब्बर आहे. छे ! या दोघी ह्मणजे मला अगदीं सोन्याच्या खाणी सांपडल्या आहेत नुसत्या. प्रतिलंका, किंवा मूर्तिमंत टांकसाळी ह्मणानात ? त्यांच्यांतली एक आमची बाँबे बँक, आणि दुसरी डेक्कन बँक. आह्मी तेथून हव्या तेवढाल्या हुंड्या पटवून आणणार न् काय ? आतांरे काय बेट्यांनों आपल्याला कमी आहे ? आपलें नष्टचर्य संपलें ह्मणून समजा. हें घे, हें पत्र मथुराबाईला नेऊन दे; आणखी तूं हें द्वारकाबाईला नेऊन देरे, जा.

**नथू**—काय ? माझ्यासारख्या पुरुषाला मध्यस्थीचें काम सांगतां का काय ? आग लावा त्या पत्राला!

**नीलकंठ**—मी असले नीचपणाचे धंदे साफ करणार नाहीं. हें घ्या आपलें पत्र. मला आपल्या अब्रूची साफ परवा आहे.

**मुकुंदराव**—काय, तुह्मी माझें ऐकत नाहीं? कुच् फिकिर नहीं! ए सटव्या, आमच्या व्यांकांवर एवढ्या चिठ्ठ्या नीट पोहोंचत्या करून ये जा जलदी. आलास का नाहीं अजून? चला निघारे बेरडांनों, नाहींसे व्हा इथून! हं, उचला पाय. करा आपलीं तोंडें काळीं. तुह्मांला वाट फुटेल तिकडे जा. कांहीं तुमच्या-वांचून माझें अडायचें नाहीं. नीच कुठचे!

[ मुकुंदराव व सटव्या जातात.

**नथू**—आणि आमचेंहि जे आहेत्ते तुझ्यावांचून कांहीं नडायचें नाहीं, समजलास? हरामखोर कुठचा! आंतडीं लोंबविलीं पाहिजेत गुलामाचीं. कारे निळ्या, आपल्याला हजार धंदे खुले आहेत, नाहीं? याचीच कशाला एवढी टुरटुर आणि पत्राज पाहिजे? आह्मी तुझ्याहिपेक्षां अधिक डौलानें रहातों कीं नाहीं बघ ह्मणावें.

**नीलकंठ**—माझ्या मनांत बुवा साफ याचा सूड उगवण्याचे विचार घोळत आहेत.

**नथू**—काय, आपल्याला सोडून दिल्याबद्दल त्याचा सूड उगवायचा ह्मणतोस?

**नीलकंठ**—अगदीं साफ.

**नथू**—पण तो कसा उगवणार? त्याला खतपाणी तर पाहिजे? या राज्यांत तरवारीच्या पाण्यानें कोणाचा सूड उगवायचें तर नांवच नको घ्यायला. तेव्हां तुमच्या अंगांतच जेवढें पाणी असेल त्याच्या जोरावर काय व्हायचें तें होणार.

**नीलकंठ**—आपल्या अंगांत पाणी आहे, आणि डोक्यांतहि पण अक्कल आहे; मग तूं कां भितोस? मी या हत्तीच्या पिल्लाचे बेत त्या विनायकरावाला जाऊन सांगतों. मग पहा कशी साफ गम्मत उडते ती.

**नथू**—वाहवा! मीदेखील या पावलीं रामभाऊची गांठ घेतों; आणखी त्या मुक्याचा तुझ्या बायकोला भुलवण्याचा, आणखी तुझे पैसे लुबाडण्याचा मतलब आहे वगैरे वगैरे त्याचें सारें कारस्थान रामभाऊच्या नजरेस आणतों.

**नीलकंठ**—या हरामखोराला बरोबर करण्याबद्दल मी विनायकरावाला चिथावून देतों. त्याच्या मनांत सप्पाटून मत्सर उत्पन्न करतों; ह्मणजे तो त्याचें साफ काम करून टाकील.

**नथू**—शाबास आहे बुवा तुझ्या युक्तीची! चला, देऊं मजा उडवून न काय?

[ जातात.

---

## प्रवेश ४ था.

[ **स्थळ**—व्यंकप्पा डाक्तरचें घर. सखूबाई, तान्ह्या, व बाळू बोलत आहेत. ]

**सखू**—हें बघ तान्ह्या, रस्त्यावरच्या खिडकीशीं जाऊन बैस, आणखी डाक्तरसाहेब येतांना दिसले तर लागलीच मला येऊन सांग, बरं का? हा परका माणूस घरांत आलेला जर त्यांच्या नजरेस पडला, तर ते अगदीं सळो कीं पळो करून सोडतील; आणखी मराठी भाषेचे खुनांवर खून पाडतील.

**तान्ह्या**—जी व्हय.

**सखू**—जा तर. संध्याकाळच्या जेवणाबरोबर तुला एक गुळाचा खडा देईन बरं का. (तान्ह्या जातो.) हा तान्ह्या मोठा इमानी नोकर आहे. कामांत कद्धीं ह्मणून चुकारपणा किंवा कसूर करायचा नाहीं. शिवाय, आपलं काम बरं कीं आपण बरा. कुणाच्या आध्यांत नाहीं, मध्यांत नाहीं. लावालाव्या करायचा नाहीं कीं कांहीं नाहीं. पण मेला साऱ्या मुलखांतला वेडा आहे! बरं, पण तूं काय ह्मणालास? तुझं नांव बाळू का?

**बाळू**—व्हय, तांच.

**सखू**—कायरे, तुमच्या कोंकण्या लोकांत बाळूशिवाय दुसरं नांवच नाहीं कारे? बरं, तुझ्या धन्याचं नांव काय ह्मणालास? सोनबा नाहीं का? का सोन्याबापू, का सोनोपंत, का सोन्याजीराव, का सोनूअण्णा, का सोनटक्क्या, काय?

**बाळू**—कायबी ह्मना!

**सखू**—त्यांनीं कल्लेदार मिशा अन् मोठी थोरली शेंडी न् कमानदार घेरा ठेवला आहे तेच कीं नाहींत तुझे यजमान?

**बाळू**—नायबा! मक्याच्या कनसापरमान् भुरक्या शेंडीची योकूच बट हाय त्येंच्या डोईवरती. आन् मिशीदिकुल त्येच रंगाची हाय वांइच वांइच.

**सखू**—असं का? बरं कायरे, ते स्वभावानं अगदीं गरीब आहेत नाहीं?

**बाळू**—व्हय. अक्शी फार गरीब बगा. तरीपन त्येंची काठी मजबूत हाय व्हो? त्ये कंदी कंदी कुस्ती करत्यात म्हन!

**सखू**—होय ना? आतां आलं माझ्या ध्यानांत. ते असे कुबड काढून उडत उडत चालतात तेच कीं नाहीं?

**बाळू**—आतां मातर वळकलांव बगा.

**सखू**—खरंच बाई, कालिंदीला जर तो सोन्या नवरा मिळाला तर सोन्याहून पिवळं होईल ! गोविंदभटजींनां सांग, ह्मणावं मी तुमच्या यजमानांच्यासाठीं होईल तितकी खटपट करीन बरं. माझी कालिंदी मोठी सालस पोर आहे. तिला—

**तान्ह्या**—( प्रवेश करून ) डागदारसाब याया लागल व्हो. [ जातो.

**सखू**—अगबाई ! होय का ? आतां कंबक्तीच झाली ह्मणायची ! अरे बाळू, ये लवकर; या खोलींत लपून बैस. ते कांहीं फार वेळ रहायचे नाहींत घरीं. (बाळूस खोलींत कोंडते.) खुश्शाल या ह्मणावं आतां. (मोठ्यानें) तान्ह्या, अरे तान्ह्या बाबा, आज दाक्तरसाहेब कां नाहीं आले अजून ? जा, दवाखान्यांतून शोधतरी घेऊन ये ? ( गाते. ) 'मदन तात मनमोहन मुरली वाज—

**व्यंकप्पा**—(प्रवेश करून) काय, तुह्मी गाण कर्तां काय? मला तें आवडत नाहीं बगा. बर, माझ खोलींत एक पेट्गी आहे. त्याच दार काढून आंत चारपाच बाटली आहे, तेवढ मला आणून या. हिरव्या रंगाचा आहे बगा.

**सखू**—आणलें. ( स्वगत ) बरं झालं बाई हे स्वताच नाहीं गेले खोलींत. नाहींतर तो बाळू जर का यांच्या नजरेस पडता, तर आकाशपाताळ एक करून सोडलं असतं. [ जाते.

**व्यंकप्पा**—( स्वगत ) हेच्चुबहळ केलस् अद अप्पा ! दावाग् बरताळ इक्की.

**सखू**—( बाटल्या घेऊन येते ) ह्याचना ?

**व्यंकप्पा**—ह्याच. तो तान्ह्या कुट गेला ? हुच रंडे गंडा, यह्लि होग्यानो येनु!

**सखू**—तान्ह्या, अरे तान्ह्या ?

**तान्ह्या**—जीअ रावसाव ?

**व्यंकप्पा**—कुट्ट गेला होत्तारें ? ही बाटली घेऊन डिस्पेन्सरीला पळून जा बग. मी सायकलवरून येतात.

**तान्ह्या**—जीअ रावसाव.

**व्यंकप्पा**—फार वेळ झाला. ( जातां जातां ) अय्यो नम्मप्पा ! ती दुसरी औषध घ्यायची उरलीच की ! मीच घेऊन येतो.

**सखू**—अरे राम, झालेंच काम ! आतां काय तो यांनां दिसल्याशिवाय राहतो आहे ?

**व्यंकप्पा**—अय्यय्यो ! माझ खोलीत कोण आहे ? बोळी मगना. ( बाळूस बाहेर ओढून काढतो ) अरे तान्ह्या, माझा चाबूक घेऊन या बघूया ?

**सखू**—डाक्तरसाहेब, रागावूं नका.

**व्यंकप्पा**—रागावूं नका ? कशाला रागावूं नका ?

**सखू**—हा कांहीं कुणी चोरबीर नाहीं. गरीब माणूस आहे बिचारा.

**व्यंकप्पा**—गरीब झाला तर काय झाल ? त्यानी माझ खोलीत कशाला आला ?

**सखू**—जरा शांत व्हा. मी सारं सांगत्यें. तो त्या गोविंदभटजींकडून एक निरोप घेऊन माझ्याकडे आला आहे.

**व्यंकप्पा**—निरोप ? निरोप म्हटल तर काय राहत ?

**बाळू**—जी व्हय. त्येनी सांगतलान् हाय का—

**सखू**—मधें बोलूं नकोरे, बैस उगीच.

**व्यंकप्पा**—तुझीच बसा उगीच. तुझी गोष्ट काय सांग रे ?

**बाळू**—मी ह्यासनी कागूद घेऊनशी आलतां. त्यांत ल्हिवलाय का, कालिंदी-बायला माझ्या धन्याशी लगीन कराया सांगा म्हनूनशी.

**सखू**—खरी गोष्ट. पण मला काय एवढ्या उद्योगाची गरज? मी नाहींग बाई त्या भानगडींत पडायची !

**व्यंकप्पा**—तुला कोण तो भट्टुरगा पाठिवला नाहीं का ? वळ्ळेदु. तान्ह्या एक कागदाचा चूर घे बघूया ? ( बाळूस ) थोड थांब रे तूं. ( लिहूं लागतो. )

**सखू**—( बाळूस ) बरं झालं बाई, थोडक्यांत निभावलं. नाहींतर, जर का स्वारीचं पित्त खवळलं असतं तर सारी आळी दणाणून सोडली असती. ठीक आहे; तुझ्या धन्यासाठीं माझ्या हातून होईल तितकं पाहीन बरं ? बाकी, सांगूंच का तुला, मी पडल्यें या काटप्पाची नोकर. ह्याचा सैंपाक, चहापाणी, बाजारहाट, झाडलोट, शिवणंटिपणं सारं मी करत्यें.

**बाळू**—मंग म्होटां जोखमीचां काम असल तुमचां ?

**सखू**—कांहीं पुसूं नकोस बाबा ! जी एका सकाळीं पांच वाजतां उठल्यें, ती निजेतोंवर रात्रीचे अकरा वाजून जातात. पण तुला सांगणार होत्यें तें राहिलंच, जवळ ये, तुझ्या कानांत सांगत्यें; पण त्याचा फारसा बभ्रा करूं नकोस हो ? हें पहा किनै, खुद्द डाक्तरसाहेबांच्या मनांतून कालिंदीशीं लग्न करायचं आहे, समजलास ? बाकी, तिचं मन मला पक्कं ठाऊक आहे. तें हिकडेहि नाहीं, अन् तिकडेहि नाहीं.

**व्यंकप्पा**—ए हुच्चमुंडेगंडा, हा पत्रा भट्टरग्याला नेऊन दे जा. तुझं खोड मोडतो बग ह्मणाव.

**बाळू**—देतां निऊनशी. [ जातो.

**सखू**—त्यांनीं बिचाऱ्यांनीं केलं तें आपल्या यजमानांच्या वतीनं केलं.

**व्यंकप्पा**—तर काय झाल ? तिन माझ्याबरोबर लग्न करतील ह्मणून तुह्मी मला सांगतात नाहीं का ? त्या भट्टयाला हात दाखवतो. ये ह्मणाव मगना !

**सखू**—तिचं मन तुमच्यावरच आहे बरं. डाक्तरसाहेब, मी तुह्मांला सांगलें, सगळं कांहीं नीट जुळून येईल; मग लोक वाटेल तें का बरळेनात !

**व्यंकप्पा**—तर हरकत नाहीं. तान्ह्या डिस्पेन्सरीला शिवला असेल नाहीं ? हें बगा, कालिंदी मला मिळाली नाहीं तर तुह्माला हक्लासून सोडीन आं ? [जातो.

**सखू**—( स्वगत ) ती वेळ केव्हांतरी येणारंच. पण तोंपर्यंत तरी मी आपली तुमडी भरून घेईन ? कालिंदीचं मन मला माहीत आहे. ती माझ्याशीं जशी मोकळ्या मनानं बोलत्ये, तशी या साऱ्या गांवांत कुणाशीं बोलत नाहीं. आणखी, ती माझं ऐकेल तसं दुसऱ्या कुणाचंहि ऐकायची नाहीं.

**शंकरराव**—( पडद्यांत ) कोण आहे घरांत ?

**सखू**—( स्वगत ) हें कोण बरं ? ( उघड ) पुढं या, पुढं.

**शंकरराव**—( प्रवेश करून) कसें काय सखूबाई, ठीक आहेना ?

**सखू**—चाललं आहे तुमच्यासारख्यांच्या कृपेनं !

**शंकरराव**—बरें, कांहीं नवलविशेष? कालिंदीला भेटलां होतां का अलीकडे?

**सखू**—हो. मुद्दाम तुमच्यासाठीं तीन हेलपाटे खाल्ले, तेव्हां कुठं ती थोडा वेळ एकटी सांपडली. तुमच्याबद्दल मीं तिच्या मनाचा ठाव काढून पाहिला आहे.

**शंकरराव**—मग कसें काय ? आहे का कांहीं आशेला जागा ?

**सखू**—काय आतां प्रभु करील तें खरं ! बाकी, मी तुह्मांला खास सांगलें हो शंकरराव, कीं, तुमच्यावर तिची मेहेरनजर आहे. एवढं अगदीं लिहून ठेवा माझं वचन. काय हो, अलीकडे तिला शिकवायला जातांना तुह्मी निराळ्या तऱ्हेचा भांग काढून जात असतांना पण ?

**शंकरराव**—तुह्मांला काय ठाऊक ?

**सखू**-तें आतां तुह्मीच पहा. तुमच्या भांगाबद्दल सारखं दोन प्रहर आमचं बोलणं चाललं होतं. अहाहा ! पोरगी पण पोरगी आहे हो ! तिच्यावांचून मला बाई अगदीं चैन पडत नाहीं. कितीतरी गरीब अन् समजूतदार ! मीं सांगितलेली

गोष्ट तिला पटली नाहीं, असं व्हायचंच नाहीं. सदा तिचं हंसतमुख असायचं. पण परवां माझं अन् तिचं बोलणं झालं, तेव्हांपासून नेहमीं विचारांत गढून गेलेली दिसते; याच्यावरून ओळखा कायतें.

**शंकरराव**–समजलों समजलों. हें घ्या तुह्मांला बक्षीस. तुमची मदत असल्यावर आणखी हो काय पाहिजे?

**सखू**–बाई माझी कसली आली आहे मदत त्यांत? तुह्मीच तिला रोज रोज शिकवायला जातां, तास न् तास एकटे तिच्याबरोबर घालवतां!

**शंकरराव**–ह्मणून काय झालें? या बाबतींत मीं तिच्याजवळ कधीं ब्र काढला असला तर शपथ. बरें, जातों मी आतां. थोडा गडबडींत आहें.

**सखू**–बरं आहे. तुमच्या भांगाबद्दल कालिंदी काय ह्मणाली तें मग सावकासपणीं सांगेन केव्हांतरी.

**शंकरराव**–ठीक आहे. [ जातो.

**सखू**–फारच बाई चांगला माणूस हो! कालिंदीला अगदीं छान शोभेल. पण तिचं कुठं त्याच्यावर प्रेम आहे? तिचं मन कुठं आहे तें मला ठाऊक आहे. अगबाई! पण या नादांत त्या कामाचा अगदींच विसर पडला!

[ जाते.

[ पडदा पडतो. ]

## अंक २ रा.

### प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—विनायकरावांच्या घरापुढील रस्ता. मथुराबाई हातांत फोडलेलें पत्र घेऊन प्रवेश करिते. ]

**मथुराबाई**—कायतरी बाई! तरुणपणाच्या ऐन भरांत असतांना माझ्याकडे कुणाची नजर गेली नाहीं, अन् आतां या वयांत मला ही प्रेमाची पत्रिका? मोठा चमत्कार आहे! मेल्यानं कायतरी लिहिलं आहे? (वाचते) 'तुमच्यावर आमचें प्रेम कसें बसलें, हें कांहीं विचारूं नका. कारण प्रेम आंधळें आहे. शिवाय, तें विचाराला मुळींच जुमानित नाहीं. तुमचें तारुण्य उलटून गेलें आहे, आमच्याहि वयाला उतार लागला आहे. केवढें हें साम्य आणि प्रेम करायला कारण! त्याचप्रमाणें तुमचा स्वभाव हौशी आहे, आमचाहि दिल रंगेल आहे. घ्या, आणखी साम्य न् प्रेमाला कारण!!! तसेंच, तुह्मांला चहा उत्तम करतां येतो आमचीहि चहावर फार भक्ति आहे. आणखी जास्त साम्य! आतांतर कांही विचारायलाच नको! तुह्मीच पहा, तंबाखू खाणारांची बोलतां बोलतां दोस्ती जमते; विड्या फुंकणारांची हांहां ह्मणतां मैत्री जुळते; मग चहाभक्तांची हातोहात गट्टी कां होऊं नये बरें? आणखी, त्यांतून तुमचेआमचे कितीतरी गुण जुळत आहेत. मी ह्मणतों, मोठी चिकित्सा करून जीं लग्नें लावतात, त्यांतल्या पत्रिकांचे सुद्धां इतके गुण पटत नसतील. मग कसें काय? अवकाश कायतो तुमच्याच कडून आहे. माझें—मी जहागीरदार आहें, रावसाहेब आहें, हें तुम्हांला माहित आहेच, अशा माझें—तुमच्यावर प्रेम आहे. आणखी काय पाहिजे? माझ्यावर मेहेरबानी करा, दया करा, असें मी लिहित नाहीं. कारण, माझ्यासारख्या रावसाहेब किताबवाल्यानें कोणाला तसें लिहिणें शोभत नाहीं. तेव्हां मी एवढेंच ह्मणतों कीं, माझ्यावर प्रेम करा.—तुमच्या चरणीं तन मन धन अर्पण केलेला दासानुदास, रावसाहेब मुकुंदराव.' इश्श—कायतरी मेल्याचं हें लिहिणं! आतां या मेल्याचे केंस पिकायला लागले, दांत पडायला झाले, अर्ध्यामुर्ध्या गोंवऱ्यादिखील स्मशानांत गेल्या, अन् आतां या वयांत याला हे ढंग सुचताततरी कसे? मेल्याची अक्कलतरी गेली कुठं? तिकडे घरांत नसतांना केव्हां आला, तर नाइलाजास्तव याच्याशीं दोन शब्द बोलावे लागतात, इतकेंच कायतें. मग याच्या डोक्यांत हें भलतंच वेड शिरलं कसं! छे बाई, मोठाच चमत्कार आहे! असं वाटतं कीं

साऱ्या पुरुषांनां पिंगलेश्वराच्या शिखरावरून थेट खालीं लोटून द्यावेत! तें कांहीं नाहीं, या लठ्ठ बोकडाची खोड पण खोड मोडली पाहिजे!

**द्वारकाबाई**—(प्रवेश करून) अग बाई, बरी गांठ पडली. मी तुमच्याकडेच येत होत्यें.

**मथुराबाई**—होय का? मीदिखील तुमच्याच घरीं निघाल्यें होत्यें. पण तुमचा चेहरा आज उतरलेला हो कां दिसतो, द्वारकाबाई?

**द्वारकाबाई**—भलतंच? कांहीं असेल तर त्याच्या अगदीं उलट असायला पाहिजे!

**मथुराबाई**—पण मलातर तुमचं तोंड सुकलेलं दिसत आहे.

**द्वारकाबाई**—वास्तविक तें प्रफुल्लित दिसायला पाहिजे. मी कीं नाहीं, तुमचा सल्ला विचारायला आल्यें आहें हो!

**मथुराबाई**—असं झालं आहे तरी काय?

**द्वारकाबाई**—एवढं घाबरायला नको कांहीं! हें पहा, एक लहानशी अडचण आहे; नाहींतर मला मोठी प्रतिष्ठा मिळवायची संधी आली होती.

**मथुराबाई**—मग ती लहानशी अडचण दूर करा, अन् मोठीशी प्रतिष्ठा प्राप्त करून घ्या. त्याचा एवढा विचार काय पडला आहे तुह्मांला?

**द्वारकाबाई**—काय सांगूं बाई! एक पळभर जर कुलाशीलाचे विचार बाजूला ठेवले, तर यापुढं जन्मभर जहागीरदारीण व्हायला सांपडेल!

**मथुराबाई**—काय, ह्मणतांतरी काय तुह्मी? तुह्मी जहागिरदारीणबाई होणार?

**द्वारकाबाई**—उगीच वेळ घालवूं नका. हें पत्र वाचून पहा म्हणजे सारं ध्यानांत येईल. मी ह्मणत्यें, मेल्या सगळ्या पुरूषांनां एकदम ठार केले पाहिजेत—

**मथुराबाई**—दोघांशिवाय!

**द्वारकाबाई**—निदान मेले लठ्ठ बोके जेवढे माजले असतील तेवढ्यांनांतरी भीमेच्या संगमांत नेऊन बुडविलं पाहिजे. परवां तुमच्या घरीं पुरुषांपुरुषांमधें बाहेरख्यालीपणाचा विषय निघाला होता, त्यावेळीं तशा माणसांवर हा शिराळशेट अगदीं तुटून पडत होता. तेव्हां वाटलं, हा खराच बाई रामाचा अवतार आहे. पण जळलं मेल्याचं नांव! मेले पुरुष तेवढे सारे एका माळेचे मणी! मी ह्मणत्यें, या ढेरपोट्याचा मोर्चा चतुरगडावर फिरलातरी कसा? मथुराबाई, या टोणग्याचा सूड कोणत्या तऱ्हेनं उगवूं, सांगा? माझ्या मनांत असं आलं आहे कीं, याच्या तोंडाला उगीचच मधाचं बोट लावून ठेवावं, अन् याच्या मनांत प्रेमाची ज्वाळा पेटली कीं,

तिच्या धर्गीनं याच्या अवाढव्य पोटांतली चरबी खुशाल वितळूं द्यावी; अन् मग आपण बसावं स्वस्थ मौज बघत. आहे कीं नाहीं युक्ति ?

**मथुराबाई**—तुम्हांला एक गम्मत दाखवूं का? हें पहा अगदीं तुमच्या पत्राबरहुकुम दुसरं पत्र. अगदीं त्याचं जुळं भावंड! मात्र त्यांत तुमचं नांव आहे, अन् यांत माझं आहे. मग तुम्ही जहागीरदारीण होतां, का मी होऊं? मी तुम्हांला खात्रीनं सांगत्यें कीं, त्या मेल्याजवळ नांवाच्या जागा मोकळ्या सोडलेल्या अशा या पत्रांच्या पुष्कळशा नकला असतील. झाली एखादीची आठवण, कीं लिहिलं तिचं नांव, अन् दिली चिठ्ठी पाठवून! आपण लग्नचिठ्ठ्या नाहींका पाठवीत? त्यांतलंच आहे हें. त्यांत जसं 'आपण आल्यानं विशेष शोभा येणार आहे,' असं सरसकट लिहिलेलं असतं, तसं या मेल्याचं,जिलाजिला तो चिठ्ठी पाठवील, तिच्यावर कायतें निस्सीम प्रेम! कशीं बाई माणसं हीं! यांची बुद्धि फिरतेतरी कशी? कुत्र्यामांजरांत दिखील एकनिष्ठपणा आढळेल; पण या पुरुषांच्यासारखे पापदृष्टि, विषयलंपट, आणि विवेकशून्य प्राणी त्रिभुवनांत आढळायचे नाहींत!

**द्वारकाबाई**—हंः! अगदीं हुबेहुब एक आहेत हीं दोन्हीं पत्रं! अगदीं तेंच अक्षर, तेच शब्द, सारं तेंच! आपण कोण आहोंत असं त्याला वाटलंतरी ?

**मथुराबाई**—कुणास ठाऊक! त्या लठ्ठ बोकडाला असंतर नाहींना वाटलं, कीं, या लिहिणंवाचणं शिकलेल्या बायका, यांनां कसला आला आहे धरबंद! लिहिणंवाचणं शिकल्या म्हणजे बायका फाजील होतात असा या मूर्ख लोकांचा एक समजच होऊन बसला आहे! हीं माणसं अशीं चळायला लागलीं, तेव्हां बाई मला स्वताच्या मनाबद्दलसुद्धां बेभरंवसा वाटूं लागला आहे! माझ्या नकळत माझं मन त्याच्यावर गेलेलं त्यानं ताडलंदिखील असेल! त्याखेरीज त्याच्या हातून हें धाडस घडलं नसतं!

**द्वारकाबाई**—मेल्याचं धाडस तर खरंच. याबद्दल धडापासून त्याचं शीरच वेगळं करायला पाहिजे! निदान त्याला काळ्यापाण्यावरतरी धाडलं पाहिजे. पण तें कसं जुळणार? आतां त्याला सुरेखसा धडा शिकविणं आपल्या हातून होईल, तेवढं आपण करूं.

**मथुराबाई**—खरंच! तुम्हीं म्हटलंत तसंच करूंया. त्याला आपण सपाटून आशा लावून ठेवूं; उगीचच त्याच्याशीं कांहींतरी संकेत ठरवूं; हव्यातशा चाळवण्या दाखवूं; नाहींनाहीं त्या गोष्टी करायला लावूं; अन् शेवटीं त्याच्या भ्रमाचा भोपळा फोडून टाकून त्याची फटफजिती करूं.

**द्वारकाबाई**—स्वताची अब्रू बचावून त्याचा जितका छळ करतां येईल, तितका करायला मी कद्धीं सोडायची नाहीं! हं:, हें पत्र जर का तिकडच्या नजरेस पडलं, तर अकांडतांडव करून टाकायचं होईल! आधींच मुलखांतला संशयखोर स्वभाव, अन् त्यांत या पत्राची भर पडल्यावर तर विचारूंच नका!

**मथुराबाई**—आमच्या घरचा स्वभाव नाहीं बाई असा. अन् मीहि तिकडे आपल्याबद्दल शंका घ्यायला मुळींच जागा ठेवित नाहीं. तिकडच्या मनाला माझ्याबद्दल कुकल्पना कधींहि शिवायची नाहीं.

**द्वारकाबाई**—सुखी आहांत बाई तुम्ही या बाबतींत!

**मथुराबाई**—पाहिलंतका, कोण इकडे येत आहेत ते, द्वारकाबाई? बरं, चला जाऊं आपण आतां माडीवर अन् त्या चरबी रावसाहेबांची कणीक कशी नरम करायची, त्याचा विचार करित बसूं.

( मथुराबाई व द्वारकाबाई जातात. नंतर, रामभाऊ व नथू, आणि विनायकराव व नीलकंठ बोलत बोलत प्रवेश करतात. )

**रामभाऊ**—छे:! मला नाहीं हें खरें वाटत.

**नथू**—मी तुम्हांला खात्रीपूर्वक सांगतों कीं, रावसाहेब मुकुंदराव यांचा जे आहेत्ते, तुमच्या कुटुंबावर डोळा आहे.

**रामभाऊ**—काय म्हणतां? माझ्या बायकोवर नजर आं!

**नथू**—नुसतें आश्चर्यच का करित बसणार? अहो दुसऱ्यांनीं जागें केल्यावर तरी जे आहेत्ते, सावध व्हा? कायरे निळ्या, यायचें आहे का नाहीं? [ जातो.

**रामभाऊ**—( स्वगत ) या गोष्टीची फार बारकाईनें शहानिशा केली पाहिजे. ( विचार करित उभे रहातात. )

**नीलकंठ**—आतां काय सांगावें, विनायकराव? अहो खरें, अगदीं साफ खरें. मला काय खोटें सांगून करायचें आहे? त्या रांडलेकाचीं पत्रें पोहोंचवायला मी काय कुंटीणबिंटीण आहें थोडाच? तुम्हांला थोडक्यांत सांगायचें म्हणजे एवढेंच कीं, तुमची मंडळी साफ त्याच्या मनांत भरली आहे. हा निळू सांगतो आहे यांत जर अंतर पडलें तर साफ म्हणाल तें ऐकेन; नांव बदलून टाकीन; कान कापून देईन; मिशी उतरून ठेवीन! समजलांत? बरें आहे, जातों. [जातो.

**विनायकराव**—( स्वगत ) हा 'साफ' हरामखोर दिसतो आहे मला!

**रामभाऊ**—( स्वगत ) त्या मुकिच्याची गांठ घेतली पाहिजे एकदा.

**विनायकराव**—( स्वगत ) काय बाळ बोलत होतें पण!

**रामभाऊ**—( स्वगत ) हें जर खरें असेल, तर—

**विनायकराव**—( स्वगत ) ह्या थापाड्याच्या सचोटीबद्दल कुणीं जरी हमी घेतली, तरी याच्यावर आपला विश्वास बसायचा नाहीं.

**रामभाऊ**—( स्वगत ) त्याच्या चर्येवरून तो लफंग्या लावालाव्या करणारा माणूस असेलसें दिसत नाहीं.

( इतक्यांत सखूबाई प्रवेश करते. )

**विनायकराव**—कां सखूबाई, लेकीला भेटायला आलांत वाटतें आपल्या?

**सखू**—हो. इकडचा कांहीं समाचार कळला नव्हता अलीकडे; तेव्हां म्हटलं जाऊन यावं एकदा.

[ जाते.

**विनायकराव**—अहो तुह्मी! काय विचार चालला आहे ?

**रामभाऊ**—त्या चोरानें मला आत्तां सांगितलें तें ऐकलेंत ना तुह्मीं?

**विनायकराव**—हो. आणि त्या दुसऱ्या भामट्यानें मला सांगितलेलें तुह्मीं ऐकलें असाल?

**रामभाऊ**—त्यांत कांहीं तथ्य असेल काहो?

**विनायकराव**—छट्! मुकुंदराव असें करीलसें मला मुळींच नाहीं वाटत. ही आत्तांची दुक्कल त्याच्या पदरीं होती. त्याचें आणि यांचें कांहींतरी बिनसलें असेल, तेव्हां आतां हे त्याच्यावर नसतेंच बालंट रचित आहेत झालें.

**रामभाऊ**—कुणास ठाऊक? बरें काय हो, तो मुक्तिचा विश्रांतिभवनांतच रहातो, नाहीं का?

**विनायकराव**—होय. माझ्या बायकोची कसोटी पहाणार आहे नाहीं का? जर खरें असेल तर ये ह्मणावें. तिच्याकडून यथास्थित शोभा मात्र करून घेशील.

**रामभाऊ**—मीदेखील आपल्या बायकोच्या पातिव्रत्याबद्दल शंका घेतों, असें नाहीं. तरीपण ती जितकी त्याच्या नजरेस न पडेल, तितकें चांगलें. तिच्या गुणांवर फाजील विश्वास ठेवून निर्धास्त रहाणें, हें आपल्याला पसंत नाहीं.

**विनायकराव**—हे त्रिंबकराव आले वाटतें बडबडे! मला वाटतें, यांच्या डोक्यांत दारूच्या वाफातरी चढल्या असतील, किंवा खिशांत पुष्कळसे रुपयेतरी पडले असतील. त्याशिवाय स्वारी इतकी रंगांत असायची नाहीं!

( त्रिंबकराव प्रवेश करितात. )

**विनायकराव**—कां त्रिंबकराव, कसें काय?

**त्रिंबकराव**—ठीक आहे मेहेरबान. कमिशनरसाहेब, अहो कमिशनरसाहेब,

( इतक्यांत गणपतराव येतात. )

**गणपतराव**—आलों-आलों-नमस्कार मंडळी, नमस्कार. चला, तुम्हांला एक मौज दाखवितों विनायकराव, येतां का?

**त्रिंबकराव**—सांगा; त्यांनां ती हकीगत सांगा, मेहेरबान.

**गणपतराव**—ते व्यंकप्पा डाक्तर आणि आपले गोविंदभटजी यांच्यामध्यें कांहीं बेबनाव आला आहे.

**रामभाऊ**—अहो त्रिंबकराव, जरा तुमच्याशीं दोन शब्द बोलायचे आहेत; इकडे या. ( उभयतां एके बाजूस जातात. )

**त्रिंबकराव**—काय हुकूम आहे मेहेरबान?

( रामभाऊ त्रिंबकरावांच्या कानांत कांहीं सांगतात. )

**गणपतराव**—तेव्हां त्या बाबतींत डाक्तरसाहेब या त्रिंबकरावांच्याजवळ कांहीं बरळले. यांनीं त्यावेळीं तें मुकाट्यानें ऐकून घेतलें; पण इकडे काय मौज करून ठेवली आहे ह्मणतां? ( विनायकरावांच्या कानांत कांहीं सांगतात. )

**त्रिंबकराव**—कांहो मेहेरबान? मुकुंदरावांवर तुमची एखादी फिर्यादबिर्याद आहे वाटतें कोर्टांत?

**रामभाऊ**—छे छे, मुळींच नाहीं. हें पहा, माझी आणि त्यांची जर एकदा गांठ घालून द्याल, तर तुह्मांला सांगाल तसल्या दारूची एक सबंध बाटली देईन. मात्र माझें नांव विसाजीपंत आहे,असें उगीच गमतीखातर त्यांनां सांगितलें पाहिजे.

**त्रिंबकराव**—कुच् फिकीर नहीं. तुह्मी हव्वे तितके वेळां त्यांच्याकडे या आणि जा. आणखी तुमचें नांव काय—विसाजीपंत ह्मणून सांगायचें नाहीं का? कांहीं हरकत नाहीं. हं, चला हो मेहेरबान, चला.

**गणपतराव**—चला. आह्मी तुमचीच वाट पहात आहों.

[ त्रिंबकराव, गणपतराव व विनायकराव जातात.

**रामभाऊ**—हा विनायकराव तरी एक दुधखुळाच दिसतो आहे मला! अहो, किती जरी मनोनिग्रही झाल्या, तरी त्या बोलूनचालून बायका! त्यांच्यावर विसंबून रहाणें हें शुद्ध वेडेपणाचें काम आहे. आमच्या हिची आणखी त्या हैदोस-खानाची विनायकरावांच्या घरीं गांठ पडली होती; मग कुठपर्यंत मजल गेली आहे कुणास ठाऊक? या गोष्टीचा पुरता छडा लावला पाहिजे. त्या मुक्तिच्याकडे नांव आणि वेष पालटून जाण्याचें तर मीं ठरविलेंच आहे. आतां ती जर पवित्र आहे असें ठरलें, तर उत्तमच झालें. नाहींतर या खटाटोपांत पडल्यासारखें निदान खरें शोधून काढल्याचें समाधानतरी होईल. [ जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ स्थळ—विश्रांतिभवन. मुकुंदराव व नथू बोलत बसले आहेत. ]

**मुकुंदराव**—मी तुला एक पै देणार नाहीं.

**नथू**—नाहीं तर नाहीं. सारें जग माझें भांडार आहे!

**मुकुंदराव**—तें असूं दे. पण माझ्यापासून तुला एक छदामहि नाहीं मिळायचा. आजकाल तुमच्यासाठीं मी आपलें वजन खर्च करतों, हेंच अधिक आहे. माझें तुह्मांला पाठबळ आहे, मी त्या बेंच मॅजिस्ट्रेटांना जाऊन भेटलों, ह्मणूनच तूं आज मोकळातरी आहेस; नाहींतर तो निळ्या आणि तूं दोघेहि पांव्या वहात असतां एव्हांना; नाहींतर बसलां असतां लोखंडी गजाच्या दारांतून टकामका माकडासारखे पहात! तुह्मी नेहमीं कांहींनाकांहींतरी लफड्यांत सांपडतां; पण तुह्मी मोठे नेकीचे माणूस आहां, असें सांगून मीच तुह्मांला सोडवतों. परवां त्या बळवंतरावाच्या घरच्या लग्नांत एका मुलीच्या हातांतलें बिंदलें चोरलेंस, तेव्हां मीं तुझा कैवार घेतला ह्मणूनच निभावलासना?

**नथू**—मग तुह्मांला नाहीं वाटतें त्यांतला हिस्सा दिला?

**मुकुंदराव**—मोठे उपकारच केलेस कीं नाहीं माझ्यावर? अरे, फुकटच्या फाकट कुणीं तुमच्यासाठीं जीव आणि अब्रू धोक्यांत घालावीं? तें कांहीं का असेना, आतां तूं माझ्या नादाला लागूं नकोस, समजलास? एक छानदार धार लावलेली कात्री, आणखी पुष्कळशी गर्दी, कीं झालें तुझें काम! जा, बुधवारचा बाजार आहे, आदितवारचा बाजार आहे, पिंगलेश्वराची यात्रा आहे; शिवाय आषाढी एकादशी, नवरात्र, श्रावणे सोमवार, गणपती, ताबूत, आहेत; पुष्कळ गोष्टी आहेत, जा. माझें एक पत्र पोहोंचविणें तुझ्या जिवावर आलें नाहीं का? मोठा मानाचा पडलास कीं नाहीं? अरे, प्रत्यक्ष मी ना? मीदेखील प्रसंगीं हव्यातशा थापा मारतों, नाहींनाहीं त्या उठाठेवी करतों, कितीएकांच्या डोक्यावरून हात फिरवितों, आणि शेंकडोजणांचे गळे कापतों. आणखी तूं? तूं पडलास मोठा साळसूद, गरीब, आणि पापभीरु! तेव्हां एक पत्र पोहोंचवायचें नाकारलेंस?

**नथू**—पण, मला आतां खरोखर त्याबद्दल पश्चात्ताप होत आहे. एवढी एक वेळ माफ करा.

( इतक्यांत सटव्या प्रवेश करतो. )

**सटव्या**—आपल्याकड कोनशी आवा आलीया, रावसाब, बामनाची.

**मुकुंदराव**—दे तिला आंत पाठवून. (सटव्या जातो.) कोण बाई आली आहे बुवा ?

(सखूबाई व सटव्या प्रवेश करतात.)

**मुकुंदराव**—कोण तुह्मी ? काय काम आहे ?

**सखू**—कांहीं नाहीं, एरवींच आल्यें होत्यें. एकदोन शब्द बोलायचे आहेत आपल्यापाशीं.

**मुकुंदराव**—दोन सोडून दोन हजार कां बोलानात ? मी ऐकायला हजर आहें.

**सखू**—इथं द्वारकाबाई ह्मणून एक आहेत,–पण थोडं अलीकडे यायचं होतं आपण. मी स्वतः व्यंकप्पा डाक्तरांच्या घरीं असत्यें.

**मुकुंदराव**—बरें, द्वारकाबाई म्हणून एक आहेत; पुढें ?

**सखू**—हो, पण जरा अलीकडे यायचं होतं आपण ?

**मुकुंदराव**—बोला बोला; कांहीं हरकत नाहीं. आमचींच माणसें आहेत हीं, कुणी परकीं नाहींत.

**सखू**—असं का ? मग हरकत नाहीं. आपल्यासारख्यांचा आश्रय कोण नाहीं करणार ?

**मुकुंदराव**—पण द्वारकाबाईचें काय ह्मणालांत ?

**सखू**—फार चांगल्या आहेत हो ! काय बिचारीच्या नशिबांत लिहिलं आहे कुणास ठाऊक ? हें नशीब मोठं विलक्षण असतं बाई !

**मुकुंदराव**—अहो, पण द्वारकाबाईचें काय ह्मणत होतां ?

**सखू**—तें आतां काय सांगूं आपल्याला ? सध्या त्या मोठ्या दुःखांत काळ कंठित आहेत. आपल्याला खरं नाहीं वाटणार कदाचित्, पण आजपर्यंत लाखों मोठमोठे जहागिरदार, सरकारी नोकर, अमीरउमराव, पेणसलदार, अन् व्यापारी लोक त्यांच्यासाठीं खटपटी करून थकले. त्यांनीं नानातऱ्हा करून पाहिल्या. कुणी प्रथम त्यांच्या नवऱ्याची ओळख करून घेत, अन् मग वरचेवर त्यांच्या घरीं खेट्या घालीत. कुणी आपल्या बायकांकडून त्यांना आपल्या घरीं बसायला बोलावीत, नाहींतर कांहींतरी निमित्तानें हळदकुंकवाला, जेवायला बोलावीत. कुणी त्यांच्या मुलाचे लाड करीत. कुणी मुद्दाम परगांवाहून त्यांच्या घरीं पाहुणे ह्मणून रहायला जात. कुणी कुणीतर त्या देवाला, नाहींतर फिरायला किंवा नाटकाला, कुठेंहि गेल्या तरी सारखे त्यांच्याभोंवतीं घिरट्या घालीत.

अहो, एक ना दोन ? पण नांव कशाला? त्यांनीं एकाहिकडे नुसतं पाहिलंदिखील नाहीं. छे बाई ! कसलाले लोक त्यांच्या पायांशीं लोटांगणं घालित आले होते, पण एकालातरी त्यांनीं कबूल व्हायचं होतं ? छे, रामाचं नांव !

**मुकुंदराव**—पण हें सगळें पुराण मला सांगून काय करायचें आहे ? त्यांत माझा कांहीं संबंध आहे का ?

**सखू**—हो तर ! त्यांनींच मला आपल्याकडे पाठविलं आहे. त्यांनां आपलं पत्र पाहून कितीपण आनंद झाला आहे ह्मणून सांगूं ? त्यांचा नवरा उद्यां सकाळीं आठपासून दहांपर्यंत बाहेर जाणार आहे.

**मुकुंदराव**—आठपासून दहांपर्यंत ?

**सखू**—हो. आणखी त्यादरम्यान त्यांनीं आपल्याला अगदीं अगत्य घरीं बोलाविलं आहे. हजार अडचणी टाकून यायचं हो पण ? त्यांचा नवरा कांहीं त्यावेळीं घरांत नसेल. बिचारीला घरांत सुख कसं तें मुळींच लागूं देत नाहीं तो. साऱ्या मुलखांतला शंकेखोर आहे बाई. घरांत त्यांच्या रोज चकमकी झडत असतात.

**मुकुंदराव**—आठांच्या आणि दहांच्या दरम्यान नाहींका ? ठीक आहे. मी अगदीं खास येतों ह्मणून त्यांनां सांगा जा.

**सखू**—फार चांगलं. बरं, हें एक झालं ? आतां आणखी एक दुसरा निरोप सांगायचा आहे आपल्याला. मथुराबाईंनीं आपल्याला फार फार पुसलं आहे. अन् सांगितलं आहे कीं, आमचीं माणसं जरी पहिल्या नंबरचीं घरकोंबडीं आहेत, तरी आज नाहीं उद्यां खात्रीनं योगायोग जुळून येईल. आपल्याला सांगत्यें, फार सद्गुणी आहेत हो त्या ? देवधर्म, पूजाअर्चा, वगैरे अगदीं जिथल्या तिथें. मी कांहीं त्यांच्याइतकी पुरुषावर लुब्ध झालेली बायको पाहिली नव्हती. खरंच सांगत्यें रावसाहेब, आपल्या अंगांत कांहींतरी विशेष मोहकपणा आहे.

**मुकुंदराव**—माझ्या अंगचे जे गुण उघड उघड दिसत आहेत, त्यांखेरीज दुसरा कसचा मोहकपणा आला आहे ?

**सखू**—आपल्यासारखीं गुणी माणसं फार थोडीं !

**मुकुंदराव**—तें राहूंद्या; आधीं मी तुम्हांला असें विचारतों कीं, त्या दोघींचें माझ्यावर प्रेम आहे, हें एकमेकींनां ठाऊक आहे का ?

**सखू**—हें काय बाई विचारणं ? त्यांनां एवढंदिखील का समजत नसेल ? त्यांनीं जर आपलं हितगुज एकमेकींनां सांगितलं, तर मोठीच बहार उडून

जाईल ! हो, बरी आठवण झाली ! विनायकरावांचा गडी कीं नाहीं, थोड्या दिवसांच्या रजेवर गेला आहे. तेव्हां त्यांनां एखाद्या नोकराची फार गरज आहे. मथुराबाईच्या सूचनेवरून त्यांनीं आपल्याला सांगायला सांगितलं आहे कीं, एक आठपंधरा दिवस आपला सटव्या गडी आमच्या घरीं कामाला धाडा म्हणून. तो त्यांनां फारच आवडला आहे. विनायकरावतरी फार चांगला माणूस हो ! मथुराबाई मोठी भाग्याची, ह्मणून तिला असला नवरा लाभला. ती तिकडे हवं तें करो, पाहिजे तें एखाद्याला उचलून देओ, ने आण करो, लागेल तेव्हां बाहेर जाओ, येओ, कांहीं करो, घरांत सारं तिचं राज्य. नवरा ह्मणून तिला 'तूं हें अस्संच कां केलंस, न् तस्संच कां केलंस, अन् इतका वेळ कुठंच होतीस ?' असं एका शब्दानंदिखील कधीं विचारायचा नाहीं! बाकी, या सार्‍या गांवांत जर कुणी कित्ता वळवण्याजोगी बायको असेल, तर ती मथुराबाई आहे ! ह्मणूनच नवरातरी तिचं सारं चालूं देतो. मग आपण सटव्याला तिकडे पाठवाच बरं का ?

**मुकुंदराव**—हो हो, त्यांत काय आहे ?

**सखू**—त्यांत काय आहे, नाहीं. अगदीं याच त्याला धाडून जरूर. त्यांत मथुराबाईंचं आणखी एक धोरण आहे. कांहींतरी खुणेचे शब्द ठरवून आपले निरोप एकमेकांनां पोहोंचवायला त्याचा अतिशय उपयोग होईल. मात्र त्या शब्दांचा अर्थ काय आहे हें त्याला समजूं दिलं नाहीं ह्मणजे झालं. कारण तो आहे अजून जरा लहान; तेव्हां भलत्याच्याचजवळ सारं ओकून टाकायचा. अहो, किती झालं तरी मोठ्या माणसांची गोष्ट निराळी पडते !

**मुकुंदराव**—बरें आहे. दोघींनांहि मीं फार फार विचारलें आहे म्हणून सांगा. हें घ्या तुमच्या कामगिरीबद्दल बक्षिस. आणखी मी आतां तुमचा कायमचा ऋणी झालों, असें समजा. सटव्या, ह्या बाईच्याबरोबर जारे. ( सखुबाई व सटव्या जातात. ) छे बुवा, मला अगदीं हर्षवायु व्हायच्या बेतांत आला आहे.

**नथू**—( स्वगत ) ही एक मदनाची एजंटच दिसते आहे ! हिला जे आहेत्ते आपण वश करून घेतली पाहिजे. [ जातो.

**मुकुंदराव**—एकंदरींत त्या दोघी खरोखरच आपल्यावर भुलल्या आहेत ह्मणायच्या ! मुक्या, चैन आहे बेट्या तुझी न् काय ? हें कंत्राट बिनबोभाट मात्र साधलें पाहिजे.

**जगन्नाथ**—( प्रवेश करून ) रावसाहेब, बाहेर एक विसाजीपंत नांवाचे गृहस्थ तुमची भेट घ्यायला आले आहेत.

**मुकुंदराव**—बरें, त्यांनां आंत घेऊन ये जा. ( जगन्नाथ जातो. ) मथुराबाईनें हवे ते कारभार केले तरी विनायकराव तिला कांहीं बोलत नाहीं, असें या सखूबाईच्या बोलण्यांत आलें. तेव्हां तिच्यापासून पाहिजे तसे पैसे उपटावेत न् काय ?

( जगन्नाथ वेष पालटलेल्या रामभाऊंस घेऊन येतो. )

**रामभाऊ**—नमस्कार रावसाहेब.

**मुकुंदराव**—नमस्कार. बसा, कुणीकडे येणें झालें ?

**रामभाऊ**—परवानगीशिवाय आपल्याला भेटायचें धाडस केलें, याबद्दल माफी असूंद्या.

**मुकुंदराव**—त्यांत काय आहे ! पण आपण कोण ? कोणच्या कामासाठीं आलांत ? जग्या, तुझें कांहीं काम नाहीं इथें. तूं जा. वाटेल तर हांक मारूं तुला.

**जगन्नाथ**—बरें आहे. [ जातो.

**रामभाऊ**—माझें नांव विसाजीपंत. मी एक सावकार आहें इथला.

**मुकुंदराव**—असें का ? आपल्यासारख्यांचा परिचय होणें ह्मणजे मीं मोठा लाभ समजतों.

**रामभाऊ**—काय हें उरफाटें बोलणें ? वास्तविक आपल्यासारख्यांच्या ओळखी होणें, हें आमचें भाग्य. बाकी, पैशाबियशाच्या संबंधानें कांहीं मी आपल्याकडे आलों नाहीं, हें आपल्याला प्रथमच जाहीर करून ठेवतों. कमींतकमी तीसचाळीस हजारांची माया आहे आजकाल माझ्यापाशीं. आणखी ह्मणूनच मीं आपल्याकडे यायचा विचार केला. कारण, सांगितलें आहेना 'द्रव्येण सर्वे वशाः' पैशाला पाहिजे तें द्वार खुलें आहे.

**मुकुंदराव**—तें काय विचारावें ! पैशासारखा शूर वीर दुनियेंत नाहीं. तो हवी ती गोष्ट सर करूं शकतो पहा !

**रामभाऊ**—बरोबर आहे. सध्या माझ्या खिशांत त्या वीरांनीं फारच गडबड चालविली आहे. तेव्हां त्यांनां जर आपण आपल्या पेटीच्या तुरुंगांत टाकाल, तर माझ्यावर फार उपकार होतील. ( मुकुंदरावास कांहीं रुपये देतो. )

**मुकुंदराव**—आपण जेलरचें काम माझ्यावर कशासाठीं लादतां, हें मी नाहीं समजलों अजून ?

**रामभाऊ**—आपण ऐकून घेत असाल तर सांगतों.

**मुकुंदराव**—सांगा विश्राजीपंत, सांगा. आपल्या जेलरची कामगिरी बजवायला मी तयार आहें.

**रामभाऊ**—आपल्यापाशीं कांहीं मी फार पाल्हाळ लावित बसत नाहीं. एकदम मुद्द्याच्या गोष्टीवर येतों. आपल्या विद्वत्तेची ख्याति मीं फारजणांच्या तोंडून ऐकली आहे. आपण जरी मला ओळखित नाहीं, तरी आपली मला फार दिवसांपासून माहिती आहे. आपल्या परिचयाचा किती दिवसतरी हेतु होता; परंतु तसा प्रसंगच आला नाहीं. आतां मी आपल्यापाशीं एक गोष्ट व्यक्त करणार आहें. असें करणें ह्मणजे आपल्यापाशीं मी होऊन आपली किंमत कमी करून घेणें आहे, हें मी जाणून नाहीं असें नाहीं. पण आतां आपण माझा मूर्खपणा ऐकलात आणि त्याच्याबरोबरच तरुणपणीं आपल्या हातून ज्या काय चुका घडल्या असतील त्यांचें जर आपण स्मरण केलें, तर अशा तऱ्हेनें माणसाचें पाऊल घसरणें किती साहजिक आहे, हें आपल्या सहज लक्ष्यांत येईल. आणखी आपण खात्रीनें मला फारसा दोष लावणार नाहीं.

**मुकुंदराव**—बरें, आपलें काय ह्मणणें आहे तें ऐकूंतर द्याल?

**रामभाऊ**—सांगतोंच आतां. इथें एक द्वारकाबाई नांवाची बाई रहाते.

**मुकुंदराव**—बरें पुढें?

**रामभाऊ**—ती फार दिवस माझ्या मनांत भरली आहे; आणखी तिच्यापायीं माझा पैसाहि रगडून खर्च झाला आहे. खोटें नाहीं सांगत आपल्याला! मीं तिच्यासाठीं नाहींनाहीं ते उपाय योजून पाहिले. ती चैत्रांतल्या हळदकुंकवाला चालली, किंवा अक्षतीच्या मिरवणुकींत असली, कीं लागलोंच आह्मी तिच्या पाठोपाठ जायला. देवळांत ती प्रदक्षिणा घालित असली, तरी आमची स्वारी आहेच तिच्या मागोमाग प्रदक्षिणा घालायला. ती नाटकाला किंवा कथापुराणांनां गेली, तरी तिच्यासमोर आह्मी आपले ठेवलेले! मला वाटत होतें कीं, माझ्या सुंदर रूपाला आणि डामडौलाला ती भाळेल. पण तसें कांहींच झालें नाहीं. शेवटीं तिच्या गांठी पडाव्यात ह्मणून तिच्या नवऱ्याची ओळख करून घेतली. भाऊबीजेच्या दिवशीं बहीण ह्मणून तिच्याकडून ओंवाळून घेतलें, आणि तिला ओंवाळणीदाखल मोत्यांच्या बुगड्या घातल्या. पुढें तिच्या मुलाची मुंज झाली, तेव्हां असाच त्याला भिक्षावळ ह्मणून गोफ घातला. ह्मटलें, अशानेंतरी कांहीं जुळेल. पण कशास कांहीं पत्ता नाहीं! शेवटीं तिऱ्हाइत बायांनां पैसे चारून त्यांच्याकडून शिकस्तीचा प्रयत्न केला; परंतु फुकट. अहो रावसाहेब, आपल्याला किती

ह्मणून सांगत बसूं? सारांश काय कीं, ह्या दुष्ट मदन जसा हात धुऊन माझ्या पाठीस लागला आहे, तशी मीं तिची पाठ पुरवली बघा. पण एवढेंसुद्धां चीज झालें नाहीं. नाहीं ह्मणायला खासा अनुभव मात्र मिळाला बुवा! पण तो फार महाग पडला. तिच्या नादीं पडून मी एवढें तत्व शिकलों कीं, या बायका ह्मणजे माणसाच्या सावलीसारख्या आहेत. आपण आपल्या सावलीकडे धावूं लागलों कीं ती दूर दूर पळते. बरें, आपण तिला मागें टाकून जाऊं लागलों तर ती आपल्या पाठीस लागते. अशा या बायका! आपण जों जों त्यांची मनधरणी करावी, तों तों त्यांनां जास्तच मान चढतो. बरें, आपण त्यांनां झिटकारावें, तर त्या आपल्याशीं लघळपणा करतात!

**मुकुंदराव**—मग काय तिनें तुमची मुळींच डाळ शिजूं दिली नाहीं ह्मणतां?

**रामभाऊ**—छे हो!

**मुकुंदराव**—निदान ही गोष्टतरी वरचेवर काढली असाल तुह्मीं तिच्यापाशीं?

**रामभाऊ**—छे, एकदासुद्धां नाहीं.

**मुकुंदराव**—मग असलें कसलें तुमचें प्रेम?

**रामभाऊ**—जी हकीगत आहे, ती आपल्यापुढें मांडली आहे.

**मुकुंदराव**—बरें, पण ती मला सांगायचें कारण?

**रामभाऊ**—तेवढेंच सांगायचें राहिलें आहे आतां. हें पहा, मला स्वताला जरी तिचा लाभ घडला नाहीं, तरी ती दिसते तशी मुळींच पतिव्रता नाहीं, असें उडतउडत माझ्या कानांवर आलें आहे. तेव्हां माझ्या ह्मणण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, आपण मोठे नांवालौकिकाचे, पिढीजाद घराण्याचे, मोठमोठ्या लोकांत बसणारेउठणारे आहां; त्याचप्रमाणें आपला देह भव्य असून चेहरा मोहक आहे; शिवाय विद्वत्ता, वक्तृत्वशक्ति, सभाधीटपणा, तसेंच स्वार्थत्याग, परोपकारबुद्धि इत्यादि गुण आपल्या अंगीं ओतप्रोत भरले आहेत—

**मुकुंदराव**—काय बोलणें हें!

**रामभाऊ**—काय ह्मणजे? मी तोंडदेखलें बोलत नाहीं. खरें आहे तें बोलायला कुणाची भीति आहे? मी आतां आपली थैली खुली करतों. आपल्याला लागतील तेवढे पैसे खर्च करा; अगदीं मागेंपुढें पाहूं नका. हातांत नारळाची आई आली तरी बेहेत्तर; माझ्या हो—तुमच्या नव्हे! मी आपल्याला पैशाची वाण ह्मणून पडूं देणार नाहीं! मात्र ही द्वारकाबाई आपल्या पातिव्रत्याचा जो एवढा टेंभा

मिरवित आहे, तिचा कसेंहि करून नक्शा उतरा. आपल्या अंगांत एवढे गुण भरले आहेत त्यांचें इथें सार्थक करा. ती जर कोणाला वश झाली, तर एक आपल्यालाच होईल !

**मुकुंदराव**—वा! जिच्यावर आपली वासना गेली आहे, तिला आम्हीं वश करून घ्यावी असें सांगतां, ह्यांला आपल्या प्रेमाचें लक्षण ह्मणावें का काय ह्मणावें? आपण जी गोष्ट माझ्यावर सोंपवितां तीतर आपल्या मनोरथाच्या अगदीं उलट आहे!

**रामभाऊ**—माझें धोरण नाहीं आलें आपल्या लक्ष्यांत. सध्या तिला आपल्या शीलाची इतकी घमेंड आहे कीं, त्याच्यायोगानें तिच्यापाशीं ही गोष्ट काढायला माझी छातीच होत नाहीं. तेव्हां, तिचें पाऊल वांकडें पडलें आहे अशाबद्दल उघडउघड पुरावा माझ्यापाशीं असला, ह्मणजे तिच्याशीं लगट करायला जरा धीर येईल, आणि जोर सांपडेल. सध्या तिला आपल्या पातिव्रत्याचें आणि अब्रूचें घोडें पुढें ढकलायला आधार आहे; पण एकदा का आपण तिच्या पातिव्रत्याचा भंग केलात, कीं मला तिच्या असल्या सटरफटर सबबींचा पार चुथडा उडवायला सांपडेल व माझे मनोरथ पूर्ण करून घेतां येतील. कां रावसाहेब, विचारांतसे पडलांत?

**मुकुंदराव**—हें पहा विसाजीपंत, आपण म्हणतां हें काम कांहीं लहानसान नाहीं. पण आपण हवेतितके पैसे खर्च करायला तयार आहां ह्मणतां, ह्मणूनच मी तें आपल्याखातर हातीं घेतों. आपण आतां अगदीं बिनघोर असा. या मुकुंद-रावांनीं एखाद्या कामाला हात घातला आणि त्यांत त्यांना यश आलें नाहीं, असें अद्यापपर्यंततर कधीं घडलें नाहीं बुवा ! मी आपल्याला अगदीं खात्रीनें त्या रामज्याची बायको मिळवून देतों.

**रामभाऊ**—काय आतां आपण कराल तें खरें.

**मुकुंदराव**—माझ्याकडे लागलें ह्मणतों ना?

**रामभाऊ**—मी आपल्याला पैशांची मुळींच ददात पडूं देणार नाहीं. त्याबद्दल आपण अगदीं बेफिकिर असा.

**मुकुंदराव**—आणखी आपणदेखील द्वारकाबाईबद्दल बेफिकीर असा. ती आपल्याला मिळालीच ह्मणून समजा. आपल्याला सांगायला कांहीं हरकत नाहीं, आत्तां आपण यायच्या अगोदर एकच मिनीट तिची निरोपी उर्फ कुंटणी इथून

गेली. उद्यां सकाळीं आठ आणि दहांच्या दरम्यान त्या द्वारकाबाईच्याच अतिशय आग्रहाच्या विनंतीवरून मी तिच्याकडे जाणार आहें. त्यावेळीं तिचा तो मत्सरी डांबीस नवरा कुठेंसा बाहेर जाणार आहे ह्मणे. आपण उद्यां रात्रीं माझी भेट घ्यायला या, ह्मणजे कसा काय रंग उडतो तें आपल्याला सांगेन. यायला विसरूं नका हो !

**रामभाऊ**—ठीक आहे. आपला परिचय झाला ही मी मोठ्या सुदैवाची गोष्ट समजतों. बरें, पण काय हो रावसाहेब ! आपली आणि त्या रामभाऊची ओळख आहे का ?

**मुकुंदराव**—मरेना का लेकाचा ! मीं त्याला काळा का गोरा पाहिलादेखील नाहीं. त्या गधड्याजवळ रग्गड पैसा आहे ह्मणतात; त्यामुळेंतर त्याची गृहस्थी मला अधिकच प्रिय झाली आहे. ही द्वारकाबाई ह्मणजे त्या गुलामाच्या जामदारखान्याची किल्लीच माझ्या हातांत आली आहे, असें मी समजतों.

**रामभाऊ**—मला वाटतें, आपण त्याला बघितलेलेंतरी असायला पाहिजे होतें. ह्मणजे तो नजरेस पडल्याबरोबर त्याचें तोंड चुकवायला बरें पडलें असतें.

**मुकुंदराव**—कोण, मी त्या हरामखोराचें तोंड चुकवणार ? अहो, नुसते डोळे वटारून त्याच्याकडे पाहिलें, तर त्याची फ्यांफ्यां उडून जाईल ! समजलांत ? मी शनीसारखा त्याच्या पाठीस लागेन. तो यःकश्चित् धनगर किंवा वडारी आहे, असें मी समजतों. त्याच्या हातून हो माझें काय होणार आहे ? त्याची आपण अगदीं भीति बाळगूं नका. उद्यां रात्रीं मला जरूर येऊन भेटा, जा. ती द्वारकी हें एक बिन उष्टावलेलें पक्वान्न आहे; त्याचा उद्यां प्रथम मी आपल्या स्वताला नैवेद्य दाखवून घेतों. मग परवांपासून आपण शेष राहिलेल्या प्रसादावर चाहील तसा लाट मारित सुटा न् काय ? त्या रामडीचाला मीं आतां नुसतें धनगर आणि वडारी ह्मटलें. पण उद्यां सकाळीं त्याला 'जारिणीपति' हें पदवीदान करून येतों कीं नाहीं पहा ! मला दुसरें काम आहे, तेव्हां मी आतां जातों. नमस्कार. (पुन्हा परतून) पण अहो विसाजीपंत, उद्यां रात्रीं फार कांहीं नाहीं, एक पांच विसा रुपये बरोबर घेऊन या.

[ जातो.

**रामभाऊ**—अरे नीचा हरामखोरा ! मला या वेळीं इतका संताप आला आहे कीं, छाती फुटून जाईल कीं काय असें वाटत आहे. मी फाजील संशयखोर आहें, असें कोण ह्मणेल ? त्या कुलटेनें आपण होऊन याला निमंत्रण केलें आहे, एवढेंच नव्हे तर वेळसुद्धां मुक्रर केली आहे. आतां या पलीकडे काय बाकी उरली ?

मला आपला या गोष्टीचा बाहेरून सुगावा लागला, ह्मणून बरें झालें. नाहींतर त्या अवदसेच्या वर्तनावरून माझ्या कांहींतरी दृष्टोत्पत्तीस आलें असतें का? या बायका तेवढ्या साऱ्या नंबर एकच्या मानभावी! नवऱ्यापुढें गोड गोड हंसतील, त्याच्याशीं लडिवाळपणानें बोलतील, त्याच्यापुढें अलमदुनिया तुच्छ आहे असें दाखवितील, आणखी पांचच मिनिटांनीं नरकांत उडी घेतील! तो बिचारा नवरा, माझी बायको मोठी साध्वी, मोठी पतिव्रता ह्मणून तिकडे मनांत मांडे खातच असतो. माझ्यासारख्याच ज्यांच्या बायका जारिणी असतील, त्यांचें काय जिणें? माझी शय्या आतां भ्रष्ट होणार, माझी तिजोरी लुटली जाणार, आणखी माझ्या अब्रूला हरताळ लागणार! बरें, एवढ्यावरतरी भागतें आहे? नाहीं. तर जो रामोशी माझी अब्रू लुटणार आहे, त्याच्याचकडून मला नाहींनाहीं त्या शिव्या मिळत आहेत, आणखी मला त्या निमूटपणें सहन करून घ्याव्या लागत आहेत. इतकेंच नाहीं, तर शिवी मिळाल्याबद्दल आनंद प्रदर्शित करावा लागत आहे! तो मला धनगर ह्मणाला, वडारी ह्मणाला, तसाच महार मांग म्हणाला असता, तरी पत्करतें. पण मला जारिणीपति हा किताब देण्याची त्यानें माझ्याचजवळ प्रतिज्ञा करावी, याहून जास्त अप्रतिष्ठा ती कोणती? हा विनायकराव ह्मणजे शुद्ध गाढव आहे! आपल्या बायकोबद्दल हा इतका निर्धास्त आहे, पण या मूर्खाला असें कळत नाहीं कीं, आपली बायको किती जरी सदाचरणी आणि पापभीरु असली, तरी ती बोलूनचालून बायकोच! चोराच्या स्वाधीन घर केलें, तरी तो कदाचित् चोरी केल्यावांचून राहील; मांजरापुढें दूध ठेवलें आणि त्याला सांगितलें कीं तें पिऊं नको, तर तें वेळेस ऐकेल; पण आमच्या हिला एक घटकाभर एकटी सोडली आणखी सांगितलें कीं पापवासना मनांत आणूं नको, तर तिच्या हातून तें कालत्रयीं घडणार नाहीं. माझा शंकेखोर स्वभाव यावेळीं उपयोगीं पडला बरें! —उद्यां सकाळीं दहा वाजतां नाहीं का? ठीक आहे. नीचांनो! ते तुमचे बेत मी थोडेच सिद्धीस जाऊं देणार आहें? ह्या कृत्येला ऐन रंगांत आली असतांना पकडली पाहिजे. तसें मी उद्यां करणार. त्या मुकुंदराव रावसाहेबांना चांगले खरपूस धोपटणार; आणखी मग विनायकरावाला जाऊन विचारणार कीं, संशयीस्वभाव चांगला का बिनसंशयी चांगला?

[ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ**—सुंदरवनांतील पिंगलेश्वराची टेकडी.
व्यंकप्पा व तान्ह्या प्रवेश करतात. ]

**व्यंकप्पा**—तान्ह्या ?

**तान्ह्या**—जीअ रावसाब !

**व्यंकप्पा**—किती मारले असतीलरे ?

**तान्ह्या**—साडेपांच वाजूनशानी लई वाढुळ जाला असल बगा.

**व्यंकप्पा**—मग तो बोळीगंडा भटुरगा कशाला आला नाहीं आत्तां? मी तर त्याला लिहिलो होतो की, चार मारल्याबरोबर टेकडीवर मला भेट हो, आणखी कालिन्दी लग्नाच्या उसाफरींत पडणार नाहीं म्हणून शपथ खा. नाहीं खाल्लास तर माझ घरात मराठ्याच्या हातचा चहा, आणखी बिसकूट खाल्ला ते साऱ्या भटुरग्याला सांगून तुझ्यावर ग्रामण्य करतो. तोही मला फिरून चिठ्ठी लिहिला होता की, तुमचा पत्र शिवला, तुमी सांगाल ते करतो पण मी तुमच्या घरीं बिसकुट खाल्लो ते कोणाला सांगू नाहीं. मग त्यानी कशाला आला नाहीं ? त्याला एकट्याला इकडे बोलावून घेऊन त्याच मढ घालाव ह्मणून केलो होतो मी. तो जर येत होता तर मरत होता बग !

**तान्ह्या**—आपुन त्येच्या पाठिच अक्शी धिंड करून सोडताल, ह्ये त्या कावळ्यान वळिकल बगा, आन् ह्मनूनशानीच त्यो मुंदाम आल नसल. पन ह्ये कोनबी येतया बगा रावसाब.

( विनायकराव, गणपतराव, त्रिंबकराव व सोन्या प्रवेश करतात. )

**त्रिंबकराव**—नमस्कार हो मेहेरबान, डाक्तरसाहेब !

**गणपतराव**—कसें काय डाक्तरसाहेब ?

**विनायकराव**—तब्यतबिब्यत ठीक ?

**सोन्या**—गुडमॉर्निंग डॉक्टर. ( स्वगत ) ह्याला कालिन्दी मिळणार कीं काय ?

**व्यंकप्पा**—अय्यय्यो ! हे आहे तरी काय ? एक–दोन–तीन–च्यार ! तुह्मी इकडे कोठे आले ?

**त्रिंबकराव**—तुम्ही गोविंदभटजींची कणीक कशी तिंबवतां, त्यांची पाठ कशी रंगवतां, अन् अंग कसें फुलवतां, हें सारें पहायला आलों; समजलांत मेहेरबान ?

**व्यंकप्पा**—पण त्या अळबुक्यांनी आला कोठे ?

**त्रिंबकराव**—तो तुझांला न्याला हो नाकाडोळ्यांचे वैद्यबुवा! तुमचें शौर्य काय वर्णावें! तुम्ही दुसरे बाजीराव आहांत!

**व्यंकप्पा**—तुझी साक्षीदार आहाना! मी त्याची दोन तास वाट बघितलो तरी तो भटुरगा आला नाहीं. आतां त्याच्यावर बहिष्कार घालून सोडतो बगा

**गणपतराव**—हें पहा डाक्तरसाहेब, तो शहाणा झणून आला नाहीं. तुझी शरीराचे वैद्य आहां, तो मनाचा वैद्य आहे. तेव्हां तुमच्यासारख्यांनां असलें वर्तन मुळींच शोभत नाहीं. होय कीं नाहीं विनायकराव?

**विनायकराव**—कमिशनर साहेब, आपण आतां म्युनसिपल कमिशनर झालां, झणून असें म्हणतां. बाकी, लहानपणीं आपणसुद्धां असेच मोठे आडदांड होतां झणून मीं ऐकलें आहे.

**गणपतराव**—तें कांहीं विचारूं नका बुवा! तरुणपणीं मी खरोखरच फार द्वाड आणि व्रात्य होतों. अजूनसुद्धां कुठें मारामाऱ्या किंवा कुस्त्याबिस्त्या चाललेल्या पाहिल्या, म्हणजे मला असें स्फुरण चढतें आहे झणतां? अहो कोणी का होईना, मोठेपणीं डाक्तर, भिक्षुक, किंवा म्युनसिपल कमिशनर झाला, झणून काय झालें? लहानपणचें पाणी काय अजीबात नाहींसें होतें आहे?

**विनायकराव**—आपलें झणणें बरोबर आहे कमिशनरसाहेब!

**गणपतराव**—बरोबर आहे झणजे? आपण हरघडीला बघतों ना? अहो डाक्तरसाहेब, मी तुम्हांला घरीं न्यायला आलों आहे, चला. वैद्यकीच्या कामांत तुमचा एवढा मोठा लौकिक आहे, त्याचप्रमाणें वेदान्तविषयांत गोविंदभटजींचा हात धरणारा कोणी नाहीं आहे. तेव्हां तुमच्यासारख्यांनीं असें पोरांप्रमाणें करणें अगदीं गैर आहे. चला, माझ्याबरोबर चला.

**त्रिंबकराव**—कमिशनरसाहेब, जरा माफ करा. अहो तुझी वाईचावखात! माझा एक शब्द ऐकून घ्या.

**व्यंकप्पा**—वाईचावखात झटल तर काय व्हाव?

**त्रिंबकराव**—वाईचावखात झणजे काय? अहो आह्मी मराठींत शूर पुरुषाला वाईचावखात झणतों, समजलांत मेहेरबान?

**व्यंकप्पा**—तर मग माझे अंगात त्या भटुरग्याइतका वाईचावखात नाहीं काय? तो जर येत होता तर त्याच मढ निजवून देत होतो बगा.

**त्रिंबकराव**—पण त्याच्या अगोदर त्यानें तुमच्या अंगाचे वाभाडे काढले असते की !

**व्यंकप्पा**—वाभाडे ह्मटल तर काय रहात ?

**त्रिंबकराव**—वाभाडे काढले असते ह्मणजे त्यांनीं तुमची माफी मागितली असती बरें मेहरबान !

**व्यंकप्पा**—तर हरकत नाहीं सोडा. त्यांनीं माझे वाभाडे काढूंद्या, मग चहा प्यालेल कोणाला सांगत नाहीं, कांहीं करत नाहीं.

**त्रिंबकराव**—बरें तर मेहरबान, मी त्याला तुमच्या अंगाचे वाभाडे काढायला विचारीन बरें का ?

**व्यंकप्पा**—तर फार चांगल.

**त्रिंबकराव**—शिवाय हे मेहेरबान- ( एकीकडे ) बरें कमिशनरसाहेब, तुह्मी सारे पुढें व्हा.

**विनायकराव**—पण गोविंदभटजी तिकडे गेले असतील ना ?

**त्रिंबकराव**—हो हो, खास. स्वारीची कशी काय तिरपीट उडाली आहे बघा. तोंपर्यंत मी या काटप्पाला तिकडे घेऊन येतों.

**गणपतराव**—ठीक आहे.

**विनायकराव**—बरें आहे डाक्तरसाहेब, घेऊं आम्ही रजा ?

[ विनायकराव, गणपतराव व सोन्या जातात.

**व्यंकप्पा**—त्या भटुरग्याचा आणि माझा कालिन्दीवरून जगळा झाला, हें विनायकरावाला समजल आहे का हो ? तस असल, तर ते मला हसतील, आणखी आपली हुडगी मला देणार नाहींत बगा. त्या भटुरग्याचा मला असा राग आला आहे !

**त्रिंबकराव**—मरूंद्या हो त्याला ! तुह्मी आपला राग निववा. जरा शांत व्हा. माझ्याबरोबर माधवपुष्करणीपर्यंत येतां का ? तिथें आज कालिंदी आपल्या मळ्यामध्यें हुर्डा खायला, आणि रस प्यायला गेली आहे. तिथें ती तुम्हांला अगदीं खात्रीनें एकटी भेटेल. मग काय तें तिला विचारा. हें बघा मेहेरबान, असली संधी वरचेवर येत नसते बरें ? असे सुंदरवनांतूनच पुढें जाऊं, म्हणजे तितकें जवळ पडेल.

**व्यंकप्पा**—ठीक आहे. तुह्मी मला ही बातमी सांगितलात फार चांगल झाल. तुमच्यावर माझी फार मर्जी आहे बगा. तिकडे राणेबिन्नुरात, नवलगुंदात,

हुनगुंदात, ब्याहट्टींत, गोर्लहोसुरात माझ्या गुर्तीचे मोठे मोठे सावकार आन इनामदार लोक आहेत बगा. त्यांनीं इकडे आल तर तुमच्या विश्रान्तीभवनात बिन्हाड करायला सांगतो बगा. तुह्मांला पुष्कळ पैसे मिळवून देतो मी. तिकडे पुष्कळ लोकांना मी नीट केलो आहेत. तेव्हां मी सांगितलो तर ते तुमच्याच इथे खोली धरून राहतील.

**त्रिंबकराव**—मग मी तुम्हांला कालिन्दी कशी मिळते तें पहातों. आतां तब्यत खूष आहेना मेहेरबान ?

**व्यंकप्पा**—हो हो, चला. लघु लघु चला. तान्ह्या, माझ्या पाठीकडून येरे.

[ जातात.



## अंक ३ रा.

### प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—माधवपुष्करणी. गोविंदभटजी आणि बाळू प्रवेश करतात. ]

**गोविंदभटजी**—(स्वगत) कुठून मी या भानगडींत पडलों, असें आतां मला वाटूं लागलें आहे. ती कालिंदी आणि तो सोन्या तिकडे विहिरींत का पडेनात ! मला कुणीं एवढी उठाठेव सांगितली होती ? हे कानडी अप्पा ह्मणजे मोठे हिरवट लोक बुवा ! या व्यंकीचानें मला कसें अगदीं पेंचांत धरलें आहे पहा. ह्मटलें, यानें त्रिंबकरावांच्या हातीं निरोप पाठविला त्याप्रमाणें न यावें, तर तो बिसकुटें खाल्लयाचा बोभाट करायचा; बरें यावें, तर पिट्टी द्यायचा. पण करतां काय ? कुणब्याच्या हातचा चहा प्याल्याचा लोकांत बभ्रातर नाहीं होऊं देतां येत ? तेव्हां आपलें काय सांगेल त्याला हो ह्मणावें, आणि आलीच तशी वेळ, तर जे मुष्टिमोदक अन् धम्मकलाडू मिळतील ते मुकाट्यानें गिळावेत, असा बेत करून मी इथेंतर येऊन बसलों. अरे, पण तो जंगली आग्या वेताळ अजून कसा आला नाहीं ? ( उघड ) कायरे बाळू, नीट न्याहाळून पाहिलेंस का सगळीकडे ?

**बाळू**—बगतलां व्हो. उगवतला बगतलां, मावळतला बगतलां, खाल्लाकड बगतलां आन् वरलाकड दिकुल बगतलां—

**गोविंदभटजी**—पण पुन्हा एकदा अंमळ पुढें जाऊन पाहून ये कसा !

**बाळू**—बरां, येतां बगूनशी.

[ जातो.

**गोविंदभटजी**—माझ्या उरांत अगदीं धडकी भरली आहे बुवा ! पण त्या येन्नमाडतीनें माझी नुसती चेष्टातर केली नसेलना ? छेः, तो शनेश्वर जर आतां इकडे नाहीं आला, किंवा येऊनहि जर मी त्याच्या माराच्या तडाख्यांतून निभावलों, तर खरोखर पावलीचे पेढे वांटीन. अग आईग ! कोण हा माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला आहे तरी ! मला जर तशी संधि आली, तर त्याच्याच दवाखान्यांतली एखादी विषाची बाटली त्याच्या घशांत उपडी करीन. सच्चिदानंद, देवा—

**बाळू**—( प्रवेश करून ) डागदारसावावानी कोनसा समूर दिसतुया व्हो.

**गोविंदभटजी**—अरे आला कीं काय तो काळ ? काय या पाठीच्या नशीबांत असेल देवाला माहीत ! कायरे बाळू, त्याच्या हातांत काठीबिठी आहे कारे ?

**बाळू**—व्हेतर आमच येजमान आन् गनपतराव नि दिसर कोनवी याया लागलय !

( विनायकराव, गणपतराव व सोन्या प्रवेश करतात. )

**गणपतराव**—अरे! हेतर आपले गोविंदभटजी! कां भटजीमहाराज, आज रामेश्वराच्या अड्ड्याला सुट्टी आहे वाटतें?

**विनायकराव**—नमस्कार शास्त्रीबुवा! आज ही कुठली जागा काढली आहे आपण?

**गोविंदभटजी**—अंः—कांहीं नाहीं. अध्यात्मविषयाचें मनन करायला अशी निर्वेध ह्लेस असली ह्मणजे तितकें बरें पडतें. मुला अलीकडे या विषयाचा बराच नाद लागला आहे.

**विनायकराव**—कायहो, पण हल्लीं उकाडा ह्मणजे कोण होत आहे! आणखी तुह्मींतर अंगांत रूभरा अंगरखा घातला आहां, हें कसें काय? आणखी तुमचा आवाजहि कांपरा येत आहे. तुह्मांला कांहीं होततर नाहींना?

**सोन्या**—( स्वगत ) हें सारें कालिंदीच्या पायीं बरें!

**गोविंदभटजी**—हें पहा, या जगांत कार्यकारणभाव ह्मणून एक असतो. ह्मणजे, कारणावांचून कोणतेंहि कार्य घडत नाहीं—

**विनायकराव**—अहो कमिशनरसाहेब, मला वाटतें त्या गृहस्थांनां यांच्यापुढें आणून सोडावेत, नाहीं? हें पहा भटजी, एक गृहस्थ आहेत, मोठ्या शांत स्वभावाचे पहा; पण काय त्यांची कुणीं खोडी केली आहे कुणास ठाऊक! हल्लीं ते इतके तापले आहेत कीं, सुधी गोष्ट ह्मणून ऐकत नाहींत. त्यांच्या डोक्यांत तुमच्या या वेदांताचा कांहीं प्रकाश पडला तरच ते ताळ्यावर येण्याचा संभव आहे.

**गणपतराव**—अहो, माझ्या वयाला इतकीं वर्षे लोटलींना? पण इतका गंभीर, विद्वान आणि सज्जन माणूस अशा तऱ्हेनें बिथरलेला माझ्या कधीं पहाण्यांत आला नाहीं बुवा!

**गोविंदभटजी**—कोण, आहेतरी कोण तो?

**विनायकराव**—मला वाटतें, तुमच्या माहितींतलेच आहेत ते. आपले व्यंकप्पा–इथले प्रख्यात डाक्तर, तुह्मांला ठाऊक असतीलच!

**गोविंदभटजी**—काय, तुह्मीं माझी थट्टा आरंभली आहे कीं काय?

**विनायकराव**—कां बरें?

**गोविंदभटजी**—कां बरें? तो व्यंकप्पा तुम्ही ह्मणतां त्याप्रमाणें सज्जन, गंभीर, किंवा विद्वान यापैकींतर कांहींच नाहीं, उलट तो मोठा रास्कल आणि ब्लडीफूल आहे, असें मी तुह्मांला त्याच्या तोंडावर सांगेन!

**सोन्या**—(स्वगत) भले पठ्ठे! मग हा गडी कांहीं त्याला कालिंदी मिळूं देत नाहीं!

**गणपतराव**—अरे बापरे! आपण करायला गेलों एक, आणि झालें भलतेंच. त्या व्यंकप्पाला दोन सामोपचाराच्या गोष्टी सांगा, ह्मणून यांची विनवणी करायला गेलों, तर हेच आपले उलट त्याच्यावर काव्हले! पण हे पहा, व्यंकप्पाच येत आहेत इकडे.

( त्रिंबकराव, व्यंकप्पा व तान्ह्या प्रवेश करतात. )

**विनायकराव**—कायहो डाक्तरसाहेब, अगदीं काठी उगारूनच आलांत हें काय?

**त्रिंबकराव**—त्यांच्या हातांतली काठी हिसकावून घ्या तुह्मी. मग तोंडांतल्या जिभेनें मराठी भाषेचे हवेतितके खून करा ह्मणावें. अन् या भटजींनां इंग्रजीची कत्तल करूंद्या!

**गोविंदभटजी**—कमिशनरसाहेब, अहो कमिशनरसाहेब! मला धरा–धरा! माझे हात घट्ट धरून ठेवा; नाहींतर रागाच्या झपाट्यांत मी काय करीन अन् काय नाहीं, त्याचें मला भान रहाणार नाहीं! छे, मला अगदीं भलतीकडे राग आला आहे. दहा अंक तरी मोजून पहातों. एक—दोन—तीन—छे! राग कांहीं आवरत नाहीं अजून. चार—पांच—सहा—सात; थोडा कमी होत चालला बरें का? आठ—नऊ—अरेच्या! पुन्हा उलट खाऊं लागला; आतां काय करावें?

**व्यंकप्पा**—जरा इकडे या हो भटजीबुवा, तुमच्या कानाशीं एक गोष्ट खेळायची आहे. मी पत्रा पाठवलो त्याप्रमाण आला कशाला नाहीं?

**गोविंदभटजी**—( एकीकडे ) असे उगीचच्या उगीच रागावूं नका.

**व्यंकप्पा**—रागावू नका कशाला?

**गोविंदभटजी**—( एकीकडे ) उगीच एखाद्याचें लोकांत हंसूं करण्यांत काय हंशील आहे बरें? तुह्मी ह्मणाल त्या गोष्टीला मी कबूल आहें. ( उघड ) तुमच्या निरोपाप्रमाणें मी केव्हांचा इथें येऊन बसलों आहें. मग उगीच कशाला डोक्यांत राख घालतां?

**व्यंकप्पा**—बोळी मगना! तुमचा डोकात राख घालतो! मी तुह्माला पिंगलेश्वराचा टेकडीत बोलावलो होतो, आन मी तिथे तुमची सहा मारीपर्यंत वाट बघितलो; तरी तुह्मी आला नाहीं, आण मला शिवी देता काय?

**गोविंदभटजी**—तुह्मींच नाहीं मला या त्रिंबकरावांच्या हातीं निरोप पाठविलात कीं, पिंगलेश्वराच्या टेंकडीवर भेटा ह्मणून जरी पत्रांत लिहिलें आहे, तरी टेंकडीवर न येतां खालीं माधवपुष्करणीपाशींच भेटा ह्मणून?

**व्यंकप्पा**—कोण मी निरोप पाठिवलो ? खोटी भाषा खेळायला तुह्माला लाज येत नाहीं कशाला ?

**गोविंदभटजी**—काय त्रिंबकराव, तुह्मीं नाहीं मला यांचा निरोप सांगितलात ? ( सर्व हंसतात. )

**त्रिंबकराव**—अहो मंडळी, हंसणें बंद करा. कां मेहेरबान, डाक्तरसाहेब, विश्रान्तीभवनवाल्यांनीं कशी मजा बांधली ? आहें कीं नाहीं मी हुषार ? आहें कीं नाहीं मी युक्तिबाज ? अहो, तुह्मी जसे दुसरे बाजीराव आहां ह्मणून मीं मघांशीं ह्मटलें, तसा मी दुसरा चाणक्य आहें, नानाफडणीस आहें, समजलांत ? 'त्या भटुरग्याची हड्डी नरम करतों' असें जेव्हां तुह्मी माझ्याजवळ ह्मणालां तेव्हां मीं दिली यांनां पदरची लोणकढी थाप मारून कीं, तुह्मांला टेकडीवर न जातां खालीं पुष्करणीपाशींच वाट पहायला सांगितलें आहे ह्मणून. आमच्या भटजीबुवांच्या पाठीची मला मुळींच कळकळ नाहीं वाटतें ? बरें, समजा घटकाभर नाहीं ह्मणून. तरी तुमचा हेतु सिद्धीस गेला असता, तर तुमच्यावर फौजदारी नसती का झाली ? तुमची मला मुळींच काळजी नाहीं वाटतें ? तुमच्या दोघांच्या बऱ्यासाठीं मला केवढा त्रास सोसावा लागला पहा ? अहो नाडीपरक्षावैद्य ! असे इकडे या. अहो मेहेरबान, मनाचे वैद्य ! असे या बाजूला या. मी तुमच्यापाशीं कबूल केलें आहे कीं, कालिंदी तुह्मांला भेटवतों म्हणून ? ही घ्या आपली कालिन्दी, संभाळा ! ( गोविंदभटजींचा हात व्यंकप्पाच्या हातांत घालतात. ) या लग्नाबद्दल मी तुह्मांला मेजवानी देतों चला.

[ गोविंदभटजी व व्यंकप्पा यांशिवाय सर्व हंसत हंसत जातात.

**व्यंकप्पा**—हा बेरकी दोघालाहि फसगी घातला ! कायहो भटजी, त्या सोन्याबद्दल खटपट करत नाहीं ह्मणून कबूल करता, का माझ्या घरी कुणब्याचा चहा प्याल्याची बोभाट करू ?

**गोविंदभटजी**—माफ करा बुवा ! प्लीजकरून तेवढें करू नका. 'सोनबाची आणि कालिंदीची पत्रिका मुळींच जुळत नाहीं, आणखी मुलगी नवऱ्याच्या मुळावर आहे,' असेंच त्यांनां दडपून सांगून टाकतों; मगतर झालेंना ?

**व्यंकप्पा**—भलारे मगना. ही युक्ति नीट काढलात बगा. तुह्माला आणखी एक गोष्ट सांगतो चला.

[ जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ स्थळ—मल्हारगंजाचा रस्ता. सटव्या व मथुराबाई प्रवेश करितात. ]

**मथुराबाई**—हूं, चल चल, पुढें चल. थांबायला नको कांहीं. इतके दिवस तूं आपल्या धन्याच्या मागून चालत होतास; पण आतां माझ्यापुढं चालत जा; समजलास ?

**सटव्या**—जी व्हय ! कुत्र्यावानी धन्याच्या पाठुपाट जान्यापरीस मर्दावानी म्होर ऱ्हान मला लई गमत बगा.

**मथुराबाई**—होय ना ? तूं आहेसच तसा !

( रामभाऊ प्रवेश करतात. )

**रामभाऊ**—कां, वहिनीसाहेब, एवढ्या लगबगीनें आज कुठें निघाली आपली स्वारी ?

**मथुराबाई**—कोण, भावोजी का ? तुमच्याच घरीं चालल्यें होत्यें. द्वारकाबाई घरांत आहेत ना ?

**रामभाऊ**—आहे, बसली आहे एकटीच माशा मारीत. एकंदरींत, तुमचें फार रहस्य आहे बुवा एकमेकींशीं. बरें, हा छोकरा कुठें पैदा केलात तुह्मी ? पोरगा मोठा हुषार दिसतो !

**मथुराबाई**—कोण तो मसण्या–त्याच्यापासून आणायचा झाला आहे तो ! कायरे तुझ्या यजमानाचं नांव तें ?

**सटव्या**—रावसाब मुकुंदराव.

**रामभाऊ**—रावसाहेब मुकुंदराव ?

**मथुराबाई**—हो, तेच तेच ! जळलं तें नांव–माझ्या ध्यानांतच रहात नाहीं. अलीकडे तिकडचं फार जुळलं आहे त्याच्याशीं. पण खरंच का द्वारकाबाई एकट्याच बसल्या आहेत ?

**रामभाऊ**—अगदीं एकटी आहे.

**मथुराबाई**—जात्यें तर मी. तितकी करमणूक होईल त्यांची.

[ मथुराबाई व सटव्या जातात.

**रामभाऊ**—अग वाग फुटाणे ! हा विनायकराव निवळ सांबाचा अवतार आहे–किंवा त्याचें वाहन आहे ह्मटलें तरी जास्त शोभेल ! याचे डोळे, विचार, अक्कल गेलीतरी कुठें ? पार नायनाट झाला सगळ्यांचा ? कीं कुठें गहाण ठेवली

आहेत ? हातर बायकोच्याच ओंजळीनें पाणी पिऊं लागला ! तिचा शब्द ह्मणून खालीं पडूं देत नाहीं. मग ती कांहीं का म्हणेना ? सुधारणेच्या भरांत हा वहात चालला आहे. ह्मणे संसारांतील सर्व गोष्टी बायकोच्या सल्ल्यानें केल्या पाहिजेत ! अरे भोळसटा, पण स्त्रीचरित्र किती गहन आहे, याची कुठें आहे कल्पना अजून तुला? बायकांच्या शिक्षणाचा दुसरा तर कांहीं उपयोग व्हायचा नाहीं, परंतु आपल्या प्रियकराला चोरून प्रेमपत्रिका पाठविण्याकडे मात्र त्याचा उपयोग चांगला होईल ! या नंदीबैलानें त्या प्रेमपत्रिका अगदीं बिनबोभाट पोहोंचल्या व्हाव्या ह्मणून त्या हरामखोराचें हें कारटें अगदीं बिनदिक्कत आपल्या बायकोजवळ ठेवून दिलें आहे ! तेव्हां याला ह्मणावें तरी काय? या विनायकरावाच्या नादाला लागून मी मात्र ठार फसलों आहें. आतां ही भवानी आमच्या त्या महामायेकडे चालली आहे. मुकुंदरावाचें तें कारटेंहि तिच्याबरोबर आहेच. तेव्हां हा फेरा कशासाठीं चालला आहे याचा ज्याचा त्यानेंच तर्क बांधावा. या सटवीला मी आपला उंबरठाहि चढूं दिला नसता; पण काय करावें ? विनायकराव पडले आमचे स्नेही, तेव्हां कांहीं इलाज चालत नाहीं. या दोघीजणी पदरांनां गांठ बांधून एकदमच नरकांत उडी घालणार वाटतें ? कांहीं फिकीर नाहीं. मी आधीं या मुकुंदरावाला हात दाखवतों, मग त्या सटवीचा समाचार घेतों; नंतर या विनयाचें पांघरूण घेतलेल्या मथुराबाईचे गुण उघडकीस आणतों; आणखी शेवटीं त्या खुळोपंतांचे डोळे अजून तरी उघडत आहेत कीं नाहीं पहातों. कांहीं स्नेही मंडळीलादेखील हा सारा तमाशा दाखवायला हरकत नाहीं. ( घड्याळ वाजतें. ) हा साडेनवांचा ठोका पडला. चला तर आतां. तो मुक्कचा या वेळीं आमच्या इथें आहे, याच्याबद्दल तर शंकाच नको ! त्याला अचानक जाऊन गांठतों. मी 'शंकेखोर शंकेखोर' ह्मणून सारेजण माझी कुचेष्टा करतां नाहीं का ? बघतों आतां कुचेष्टा करतां का काय करतां तें ! हा उगवला आहे हा सूर्य आहे ही गोष्ट जितकी निर्विवाद आहे, तितकीच मुकुंदराव या घटकेला माझ्या घरांत आहे हीहि आहे. चला आतां, पाय उचलला पाहिजे. त्या हरामखोराची आज अशी हड्डी नरम करतों कीं जन्मभर आठवण राहील. पुन्हा ह्मणून—

( विनायकराव, गणपतराव, सोन्या, त्रिंबकराव, गोविंदभटजी, व्यंकप्पा व तान्ह्या प्रवेश करतात. )

**विनायकराव**—नमस्कार महाराज. बरी गांठ पडली ह्मणायची.

**रामभाऊ**—वाहवा, बरेंच झालें; सगळी मंडळी एकदम भेटली. चला; तुह्मीं सर्वांनीं आमच्या घरीं चहा प्यायला आलें पाहिजे. तुह्मांला आमच्या घरीं आज एक गंमत दाखविण्याचा माझा मानस आहे.

**गणपतराव**—आलों असतों हो, पण मला जरा काम आहे आज, तेव्हां माफ करा बुवा.

**सोन्या**—हो, (विनायकरावांकडे पाहून) यांच्या कालिंदीबाईशीं माझें लग्नाचें ठरलें आहे, तेव्हां मामा आणि मी जात आहों त्यासंबंधीं आमच्या साळूमावशीकडे कापडाचोपडाची, दागदागिन्यांची कशीकाय व्यवस्था करायची तें ठरवायला. हो, मग आयत्यावेळीं धांदल नको !

**गणपतराव**—मीं याला ह्मटलें, अजून कशास कांहीं ठिकाण नाहीं. विनायकरावांचा रुकार मिळाल्यावर कापडाचे बस्तेच्या बस्ते ताबडतोब घरीं येऊन पडतील. तसेंच, चार सोनार, पटवेकरी घरीं बसविले कीं, दोन दिवसांत दागिन्यांचे ढीगचे ढीग तयार होऊन पडतील. पण हा कुठें ऐकतो आहे ? यानें अगदीं आग्रह धरला आहे कीं, आपली आतांपासून कडेकोट तयारी पाहिजे.

**सोन्या**—कायहो विनायकराव, मग करावी ना आह्मीं लग्नाची एव्हांपासून तयारी ?

**विनायकराव**—वः ! हें काय विचारतां ? आपल्यासारख्या श्रीमंताच्या लग्नाची पूर्वींपासून कडेकोट तयारी असलेली बरी.

**गणपतराव**—मग आह्मी होतों पुढें. नमस्कार मंडळी.

[ गणपतराव व सोन्या जातात.

**विनायकराव**—या मूर्खाला मी आपली कालिंदी देणार ? बाकी, घरांतला कल खरोखरच याच्याकडे आहे. मग याच्या अंगीं असे काय गुण दिसले आहेत त्यांनां, ईश्वरजाणे !

**व्यंकप्पा**—तर काय ? आह्मी सुधारक लोक. मुलगीच्या मनांतला गंडा करायला पाहिजे; नाहींतर कसे सुधारक आह्मी ? आमची सखूबाई सांगितली कीं मुलगीच्या मनांत मला करून घ्यायचा आहे ह्मणून.

**त्रिंबकराव**—सखूबाई असें सांगितली काय ? मग हरकत नाहीं. बरें, कायहो मेहेरबान विनायकराव ! आमच्या शंकररावांनां धाब्यावरच का बसवणार आपण ? तोतर चांगला विद्वान, शाहणा, देखणा, तरुण, सुदृढ असा आहे.

हल्लीं स्वयंवराची चाल नाहीं हो! नाहींतर मी खात्रीनें सांगतों, कालिन्दीनें शंकररावांनांच माळ घातली असती.

**विनायकराव**—तुमचें ह्मणणें खरें आहे. परंतु माझा हेतु कांहीं निराळा आहे. शंकररावांबद्दल माझ्या मनांत आदरबुद्धि नाहीं, असें नाहीं. आणि एका दृष्टीनें पाहिलें तर तोच कालिंदीला योग्य वर शोभतो, यांत संशय नाहीं. तथापि, आमची सुधारणा बडबडीपलीकडे जात नाहीं, ह्मणून जो आमच्यावर वारंवार आरोप आणण्यांत येतो, त्याचें थोडेंबहुततरी निरसन करण्यास आह्मीं सुधारणा करण्यास प्रवृत्त झालेल्या प्रत्येक इसमानें तत्पर असलें पाहिजे. त्याशिवाय खरी सुधारणा होणें शक्य नाहीं. तुमचे शंकरराव सर्वगुणसंपन्न आहेत, कबूल आहे; परंतु त्यांनां कालिंदी दिल्यानें विशेष तें काय होणार आहे? आतां या व्यंकप्पा डॉक्टरांची गोष्ट घ्या. यांचा कालिंदीशीं विवाह केल्यानें केवढी मोठी सुधारणा घडवून आणल्याचें श्रेय मला मिळणार आहे? दक्षिणी आणि कानडी लोकांत शरीर-संबंध होण्याची फार आवश्यकता आहे. बस्स! कोणी कांहीं म्हणो, पण कालिंदी यांनांच देण्याचा माझा निश्चय झाला आहे. एरवीं उगाच गप्पा मारून वेळ आली असतां खरी सुधारणा घडवून आणण्यास मागें घेणारा मी नव्हें, असें या माझ्या प्रत्यक्ष कृतीनें मी विरुद्ध पक्षाला सिद्ध करून दाखवीन.

**रामभाऊ**—लोक कांहीं ह्मणोत, पण योग्य सुधारणा घडवून आणण्याच्या आपल्या निश्चयाबद्दल माझी पक्की खात्री होत चालली आहे बरें, आतां चलतां ना आमच्या घरीं. करमणूक होईल तुमची. तुम्हांला एक राक्षस दाखविणार आहें मी राक्षस! चला, डॉक्टरसाहेब तुह्मीहि चला. विनायकराव, भटजी, तुह्मांला आलेंच पाहिजे. आमच्या घरांतील राक्षस पाहून तुह्मी थक्क होऊन जाल.

**व्यंकप्पा**—तान्ह्या, तूं घराला जा. मी पाठीकडून येतो.

**तान्ह्या**—जीअ रावसाब. [ जातो.

**त्रिंबकराव**—आह्मीसुद्धां जातों हो मेहेरबान. घरीं जाऊन निवांतपणें मुकुंदरावांशीं गप्फा छाटित बसूं. आम्हांला तुमचा राक्षस नको. [ जातात.

**रामभाऊ**—( स्वगत ) तुह्मी कसल्या गप्फा छाटतां? मीच त्याची आतां गर्दन छाटणार आहें!

**सर्व**—चला, दाखवा राक्षस कसा असतो तो.

[ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ**—रामभाऊंच्या घरांतील दिवाणखाना. द्वारकाबाई आणि मथुराबाई बोलत बसल्या आहेत. ]

**द्वारकाबाई**—पांड्या, अरे धोंड्या अ— ?

**मथुराबाई**—आटपा आटपा, तो हारा कुठं आहे ?

**द्वारकाबाई**—सगळं आहे हो. धोंड्या, अरे पांड्या—?

( दोन चाकर एक मोठा हारा घेऊन प्रवेश करतात. )

**मथुराबाई**—हं आटपा, जलदी करा.

**द्वारकाबाई**—अशी या इथं ठेवारे ती पांटी.

**मथुराबाई**—चला, त्यांनां काय करायचं तें सांगून टाका लवकर. वेळ घालवतां उपयोगी नाहीं.

**द्वारकाबाई**—अरे तुम्हांला सांगितलं आहेना मघाशीं ? त्याप्रमाणं इथं बाहेरच असा बरं का ? अन् मीं तुम्हांला हांक मारल्याबरोबर ही पांटी उचलून डोक्यावर घ्या, अन् भर वस्तींतल्या एखाद्या केराच्या पेटींत नेऊन एकदम पालथी करा; समजलांत ? जर चुकलांत तर खबरदार !

**मथुराबाई**—आलंना लक्ष्यांत ? नाहींतर सारी घाण कराल पहा !

**द्वारकाबाई**—मीं त्यांनां चांगलं पढवून ठेवलं आहे हो. कायरे, त्या पांटींत केरकचरा आणि शेणबीण पसरून ठेवलं आहे ना ?

**चाकर**—समद क्येलय. आन् योक मेल्येल सडकं मांजारबी दिलय ठिऊन-शानी त्याच्यातच.

**मथुराबाई**—भले शाबास ! तुम्हीतरी आमचेच नोकर आहां ! बरं जा, आपल्या कामांत चुकूं नका हो ?

[ चाकर जातात.

**द्वारकाबाई**—हे सटवाजीराव आले पहा.

( सटव्या प्रवेश करतो. )

**मथुराबाई**—कसें काय हो ! काय बातमी आहे ?

**सटव्या**—आमच धनीसाब आल्याती मागल्या दाराशी. आन् दोरका-बाईंसनी भेटायच म्हंत्यात.

**मथुराबाई**—पण कायरे ए भामट्या, आमच्याशीं खरेपणानं वागत आहेसना ?

**सटव्या**—आइच्यान् हो बाइसाब! तुह्मी हत हात, त्ये त्याह्नी मुदली ठाव न्हाय बगा. त्यानी मला बजबजाऊनशानी सांगितलया की, मी हकड आलेल जर का मथुराबाईह्नी सांगतलस तर गाढवीच्या सटव्या, पाठीच अक्शी चामडच लोळवीन बग!

**मथुराबाई**—तसा तूं हुषार आहेस ह्मणा! मी तुला एक फक्कडशी जरीची टोपी घेऊन देईन बरं का? बरं द्वारकाबाई, मी बसूंना आतां लपून?

**द्वारकाबाई**—हो, बसा जा. अरे, सांग जा तुझ्या यजमानानां, म्हणावं एकटीच आहें मी. ( सटव्या जातो. ) मथुराबाई, चुकूं नका हो, संभाळा!

**मथुराबाई**—माझी काळजी सोडा हो तुम्ही! जर चुकल्यें तर मथुराबाईच नाहीं नांवाची! [ जाते.

**द्वारकाबाई**—बरं जा. गमतीची वेळतर येऊन ठेपली. ये ह्मणावं माकडा, तुझे कान चांगले उपटत्यें.

**मुकुंदराव**—( प्रवेश करून ) अहाहा! सुंदरी! शेवटीं हें अलौकिक रत्न मला प्राप्त झालेंना! आतां जरी मृत्यु आला तरी मी सुखानें पत्करीन. खरोखर, आज माझ्या जन्माचें पूर्ण सार्थक झालें, असें मी समजतों.

**द्वारकाबाई**—मलादिखील देवानंच हा दिवस दाखविला हो! माझे मनोरथ पूर्ण करून घेण्याची संधि आपण आज दिलीत, याबद्दल मला कितीतरी आनंद वाटतो आहे!

**मुकुंदराव**—त्यांत काय आहे हो मोठेंसें? माझ्यासाठीं तुमचा जीव तीळ तीळ तुटत आहे, हें समजूनउमजून तुह्मांला दुःखांत ठेवणें माझ्या हातून कालत्रयींतरी घडेल का? मला तशी पाल्हाळ लावून खुबीदार भाषण करायची संवय नाहीं, तेव्हां माझी काय इच्छा आहे, ती तुह्मांला एकाच सरळ वाक्यांत सांगतों. हें पहा, या पटकीच्या वाख्यांत जर सुदैवानें तुमच्या नवऱ्याचा कांटा नाहींसा झाला, तर तुमच्याशीं उघडपणें पुनर्विवाह करून मी तुह्मांला जहागीरदारीण करून सोडीन. अहो, तुमचें जितकें वर्णन करावें तितकें थोडें आहे. अंधेऱ्या रात्रीं मांजराचे डोळे काय चमकतील, इतकें तुमच्या डोळ्यांत पाणी आहे. त्याचप्रमाणें, तुमच्या भिवयांचा जो बांक आहे, तो पाहूनतर बुवा मला पुलाच्या कमानीची किंवा बैलगाडीच्या तट्ट्याचीच आठवण—

**द्वारकाबाई**—पुरे झालं बाई! माझ्या भुवया पुलाच्या कमानीसारख्याहि नाहींत, अन् गाडीच्या तट्ट्यासारख्याहि नाहींत. आपल्या आहेत कशातरी ओबडधोबड!

**मुकुंदराव**—हें तुमचें विनयाचें भाषण. छे! बोलण्याच्या कामांतसुद्धां मोठ्या बांक्या आहां बुवा तुह्मी! त्याचप्रमाणें, तुमची चालण्याची आणि हातवारे करण्याची लकब अशी कांहीं अप्रतिम आहे कीं, तुह्मी नाटकांतल्याच आहां, असें वाटतें. तुमचें नशीब खोटें पडलें हो! नाहींतर देवानें तुह्मांला एवढें सुस्वरूप दिलें आहे, त्याचें चीज झाल्यावांचून खास राहिलें नसतें. तुह्मी कपाळ-करंट्या आहां, ह्मणूनच या रामज्याच्या गळ्यांत पडलांत. बाकी, तुमची खरी योग्यता फार मोठी आहे, यांत संशय नाहीं.

**द्वारकाबाई**—उगीच आपली वाखाणणी करायची झालं. माझ्या अंगांत तसं नांव घेण्याजोगं कांहींसुद्धां नाहीं.

**मुकुंदराव**—मग मी हो कसा तुमच्यावर भाळलों? मी एवढा चिकित्सेखोर ना? पण माझेंदेखील ज्याअर्थी तुमच्यावर मन गेलें, त्याअर्थी तुमच्या अंगांत तसेंच कांहींतरी विलक्षण पाणी असलें पाहिजे. मी तुमच्या पैशाला थोडाच भुललों आहें! बरें, पण तेंच तेंच कितीदा सांगू आतां? मला बुवा त्याचा आहे अगदीं कंटाळा. तुमच्याकडे नट्टनथट्टन यायचें, आणि उगीचच तुह्मी अश्शा आहां न् तश्शा आहां ह्मणून तुह्मांला फसवायचें, हे धंदे कांहीं माझ्याहातून मुळींच व्हायचे नाहींत. मी तुह्मांला एकाच शब्दांत सांगतों कीं, माझें तुमच्याठिकाणीं बेफाम प्रेम आहे. तुमच्याशिवाय दुसऱ्या कुण्णा कुण्णावरहि नाहीं—

**द्वारकाबाई**—पण आपण ह्मणतां हें खरं कशावरून? मलातर अशी प्रबळ शंका आहे कीं, आपला सारा जीव त्या सटव्या मथुराबाईवर आहे. ती तुह्मांला फार आवडते—

**मुकुंदराव**—शाबास! तुह्मांला खूळतर नाहींना लागलें? मला तुरुंगांत रहाणें आवडतें, नाहींतर चुनकळ्यांची धुरी घेणें आवडतें, असेंदेखील ह्मणायला लागाल तुह्मी हळू हळू? ह्मणे तुह्मांला मथुराबाई आवडतात!

**द्वारकाबाई**—बरं, चुकल्यें मी. माझं आपल्यावर किती प्रेम आहे, हें एक मला ठाऊक कीं ईश्वराला ठाऊक! तें कांहीं प्रसंगाशिवाय आपल्याला कळायचं नाहीं. बाकी, वेळ जवळच येऊन ठेपली आहे ह्मणा!

**मुकुंदराव**—बरें, तुह्मी आपलें मन बरीक बदलूं देऊं नका. तुमचें प्रेम अनाठायीं नाहीं, असें पक्कें समजा.

**द्वारकाबाई**—आपण जोंपर्यंत माझ्याशीं अशाच प्रेमानं वागाल, तोंपर्यंत माझं मन खात्रीनं बदलणार नाहीं.

**सटव्या**—( पडद्यांत ) दोरकाबाय, अव्हो दोरकाबाय, या मुत्राबाई दारीं आल्याती बगा. अक्शी घामाघुम झाल्याती; आन् लई धापा टाकत्याती बगा. आन् आत्ता इकत्यात तुमासनी भेटायचं ह्मन्त्यात.

**मुकुंदराव**—अरे बापरे! त्यांच्या नाहीं बुवा मुळींच दृष्टीस पडतां उपयोगी! मी आपला लपून बसतों इकडच्या बाजूला.

**द्वारकाबाई**—बसा बसा, लवकर जा कसे! त्यांच्या तोंडांत कोणचीहि गोष्ट रहात नाहीं.

( मुकुंदराव लपतो. नंतर मथुराबाई व सटव्या येतात. )

**मथुराबाई**—काय ही तुह्मांला बुद्धि सुचली बाई! घेतलात नांवाला कलंक लावून? साऱ्या जन्माचं वाटोळं होऊन बसलं!

**द्वारकाबाई**—अहो पण मथुराबाई, झालंतरी काय?

**मथुराबाई**—कपाळ झालं माझं! चांगला सोन्यासारखा नवरा असून त्याच्या मनांत संशय उत्पन्न होईल असं वर्तन करणं ह्मणजे काय?

**द्वारकाबाई**—संशय? कसला संशय?

**मथुराबाई**—कसला संशय ह्मणून विचारतां का आणखी? चला बोलूं नका! मी समजत होत्यें कीं, द्वारकाबाई महान् पतिव्रता आहेत ह्मणून!

**द्वारकाबाई**—अहो, पण अगोदर झालं काय तेंतरी कळूं द्याल?

**मथुराबाई**—झालं काय? कांहीं नाहीं; रामभाऊ बाहेर गेलेसे पाहून तुह्मीं कुणा परक्या पुरुषाला घरांत घेतलं आहे; पण त्याच्या शोधाला ते येत आहेत हो!

**मुकुंदराव**—( पडद्यांत ) अरे बापरे!

**मथुराबाई**—आणखी त्यांच्याबरोबर एक फौजदार, अन् दोन पोलिसचे शिपाईहि आहेत!

**मुकुंदराव**—( पडद्यांत ) अग आईग! पोलिस!!

**द्वारकाबाई**—अग बाई! खरंच का पोलिसाला घेऊन यायचं होत आहे?

**मथुराबाई**—प्रत्यक्ष मीं पाहिलं ना? त्यांच्याबरोबर पोलिसचे शिपाई आहेत, अन् मागून हा मंडळीचा घोळकाच्या घोळका येत आहे! मला कळल्याबरोब्बर मी पुढं धावत आल्यें तुह्मांला सांगायला. देव करो अन् इथं कुणी नसो. कां? बावरल्यासारख्या कां दिसतां तुह्मी द्वारकाबाई? तुमचं मन निर्मळ असलं तर खुशाल येईनात ते? दोन सोडून दोनशें पोलिसांना आणा ह्मणावं, तेवढीच आह्मांला मौज झाली. पण खरोखरच जर कुणाला घरीं आणलं असलंत, तर

या पावलीं त्याला लांववा; इथून पार पसार करा. अगदीं एक मिनीटहि फुकट घालवूं नका वरं ! आपली अब्रू बचावा; नाहींतर जन्मभर रडत बसाल हो ?

**द्वारकाबाई**—आतां काय करूं बाई ? मथुराबाई, सध्या घरांत एक गृहस्थ आहेत खरे ! स्वताच्या अब्रूची मला तितकी चाड नाहीं; पण त्यांच्या जिवाचं आतां काय होईल अन् काय नाहीं, याचीच मला मोठी चटपट लागली आहे, छे बाई, त्यांनां जर कुणी सुखरूपपणं इथून बाहेर काढील, तर त्याला मागेल तें देईन ! आतां करूंतरी कसं ?

**मथुराबाई**—अगदींच हो कशी लाज सोडलीत ? ह्मणे चटपट लागली आहे ! आतां 'कचकल्ल' करून काय होणार ? भावोजी आत्तां दाराशीं येऊन धडकतील वरं ! त्या बुवाला घरांत लपवून कांहीं भागायचं नाहीं. कसातरी युक्तीनं बाहेरच नेला पाहिजे. छे बाई, द्वारकाबाई, अगदींच कसा ताळ सोडलात हा? हो जि हो ! ही पांटी कसली पडली आहे इथं ?

**द्वारकाबाई**—आज किनै माळा साफ केला, तिथला केर त्यांत आहे हो.

**मथुराबाई**—होय का ? आतां सोडवालच त्या बुवाला ह्मणून समजा ! तो जर फारसा लठ्ठ नसला, तर त्याला या हाऱ्यांत बसवा, अन् तो किडे पडलेला बुरणूस होताना माळ्यावर तुमच्या—तो कुठं आहे? तो घेऊन या; तो त्याच्यावर झांकण घालूं; अन् ही सगळी माळ्यावरची घाण आहे, असें ह्मणून दूरच्या एखाद्या केराच्या पेटींत टाकवून देऊं गड्यांकडून, ह्मणजे झालं ? कां, विचारांत कसल्या पडलां ? त्याशिवाय आतां गत्यंतरच नाहीं !

**द्वारकाबाई**—इश्शग बाई ! केराच्या पेटींत कसं टाकावं त्यांनां ? अन् शिवाय ते कसचे या पांटींत मावताहेत ?

**मुकुंदराव**—( प्रवेश करून ) पाहूं पाहूं कुठें आहे पांटी ती ? मी आपला बसतों कसातरी घुसून तिच्यांत. मग ती केराच्या पेटींत रिकामी करा, कीं आणखी त्याच्यापलीकडे कुठें करा. सध्या या घरांतून मला बाहेर काढा ह्मणजे मिळवली. खरेंच, या तुमच्या मैत्रिणबाई सांगत आहेत तसें कराच, द्वारकाबाई.

**मथुराबाई**—कोण ? रावसाहेब मुकुंदराव का ? वा: !

**मुकुंदराव**—पायां पडतों, नाक घांसतों, शेण खातों, पण सोडवा बुवा ! कसेंहि करून माझी सुटका करा इथून ! चला बसूंद्या मला त्या टोपलींत. पुन्हा ह्मणून-( पांटींत घुसून बसतो. त्याच्या अंगावर कचरा चिंध्या वगैरे घालतात. )

**मथुराबाई**—अरे ए सटव्या, जरा मदत कर ये आह्मांला. हूं, द्वारकाबाई, हांका मारा तुमच्या गड्यांना लवकर, आटपा. वा, रावसाहेब! चांगला रोजगार मांडला आहे?

**द्वारकाबाई**—पांडू, अरे धोंडू? सटव्या, जारे त्यांनां हांक मार–जा लवकर! (सटव्या जातो व दोन नोकर येतात.) अरे, सकाळीं माळा साफ केला ना आपण? तिथला केर अजून तसाच राहिला आहे या पांटींत. तो तेवढा नेऊन टाका पाहूं. रस्त्यांतच टाकूं नका बरं का? ते मेले कमेटीचे लोक रागावतील. थेट कचऱ्याच्या पेटींत नेऊन टाका ती घाण; अन् त्याच पावलीं परत या. तिथें गमत उभे राहूं नका मुळींसुद्धां. घरांत दुसरीं कामं पडलीं आहेत पुष्कळ.

( रामभाऊ, विनायकराव, व्यंकप्पा आणि गोविंदभटजी प्रवेश करतात. )

**रामभाऊ**—चला, पाय उचला लौकर. माझा संशय निराधार असला, तर तुह्मी मला हंसा, माझी हवीतशी कुचेष्टा करा; ती मी अगदीं मुकाट्यानें सहन करीन. (चाकरांस) कायरे, ही पांटी कुठें चालविली आहे? काय आहे तिच्यांत?

**चाकर**—ह्ये व्हय? पेटीमंदी केर टाकूनशानी येतोना?

**द्वारकाबाई**—माळा साफ करायला सांगितलं होतंना? गाडेच्यागाडे केर निघाला बाई तिथें! तो नेऊन टाकित आहेत हो ते मघांपासून.

**रामभाऊ**—असें काय? तर मग माळा स्वच्छ झाला एकूण? बरें, पण तुझें मन स्वच्छ व्हायचा कांहीं संभव आहे का? कीर्तितर होऊन चुकलीच आहे!

**चाकर**—हूं, उचला. ( एकीकडे ) राम बोलो, भाय राम ! [ जातात.

**रामभाऊ**—मला कीं नाहीं हो मंडळी, रात्रीं एक स्वप्न पडलें बरें का! सांगू का काय स्वप्न पडलें तें? या, घरांत या; माझ्याबरोबर शोधायला लागा. त्या कोल्ह्याला आपण धुंडाळून काढूंच काढूं! पण मला हें दार आधीं लावून घेऊंद्या आंतून. ( दरवाजा लावतात. ) आतां जा ह्मणावें हरामखोरा, निसटून.

**विनायकराव**—अहो रामभाऊ, जरा शांत व्हा? कां उगीचच्याउगीच डोकें तापवून घेतां? तुह्मांला वेडबीडतर नाहीं लागलें?

**रामभाऊ**—बरोबर आहे. मलाच वेड लागलें आहे. याहो, या तुह्मी माझ्याबरोबर. बघातर खरे काय चूष दाखवतों ती? [ घरांत जातात.

**गोविंदभटजी**—कोणतरी हा संशयी आणि डाउटफुल स्वभाव बुवा?

**व्यंकप्पा**—आमच्या कर्नाटकांत असल संशयी कधीकधीही रहात नाहीं!

**विनायकराव**—बरें, चला तर खरे. राक्षस शोधून काढित आहेत, का कोल्हा काढित आहेत, का काय काढित आहेत, तें पाहूंतरी.

( विनायकराव, व्यंकप्पा आणि गोविंदभटजी जातात. )

**मथुराबाई**—कां द्वारकाबाई, ही आणखी त्यांतल्यात्यांत दुहेरी बहार उडाली, नाहीं?

**द्वारकाबाई**—ही स्वारी कुठून ठेवल्यासारखी दत्त ह्मणून हजर झाली? त्या म्हारड्याची खोड मोडली ह्मणून मला जास्त आनंद होत आहे, का या स्वारीचा संताप पाहून जास्त मजा वाटत आहे, कांहीं सांगवत नाहीं बाई मला!

**मथुराबाई**—पांटींत काय आहे ह्मणून जेव्हां त्यांनीं विचारलं, तेव्हां त्या मेल्याची अगदीं पांचांवर धारण बसली असेल नाहीं?

**द्वारकाबाई**—कांहीं पुसूं नका! मेला अगदीं गर्भगळित होऊन गेला असेल. अन् त्यांतून ती अष्ट घाण!!

**मथुराबाई**—बरं झालं! मेला त्या पांटींतल्यापांटींतच गुदमरून मेला असला, तरी कांहीं वावगं होणार नाहीं. गांवांतलं तेवढं पाप कमी होईल. परस्त्रीवर पापवासना बाळगणाऱ्या मांगांनां अश्शीच अद्दल घडली पाहिजे!

**द्वारकाबाई**—मला वाटतं, तो टोणगा इथं आल्याबद्दलचा स्वारीला कुठून ना कुठूनतरी सुगावा लागला असावा. स्वभाव मूळचाच शंकेखोर खरा, पण आजचा रंग कांहीं निराळा दिसत आहे.

**मथुराबाई**—तेंहि समजून घ्यायला मार्ग आहे. आपण दुसरा एक व्यूह रचूंया. त्या मुकाजीपंताची आणखी फजीती उडविली पाहिजे. त्याच्या दुखण्याला एवढ्याशा औषधानं गुण यायचा नाहीं.

**द्वारकाबाई**—मग देऊंया का तुमच्या सखूबाईला पुनः त्याच्याकडे पाठवून? 'आपल्याला केराच्या पेटींत टाकलं याबद्दल फार वाईट वाटत आहे; परंतु काय करावं, तसं केल्याशिवाय दुसरा इलाजच नव्हता, एवढी गोष्ट लक्ष्यांत आणून क्षमा करावी,' असा त्याला गोडगोड निरोप पाठवून देऊं, अन् आशा दाखवून पुन्हा तोंडघशीं पाडूं.

**मथुराबाई**—हो हो, अश्शीच त्या घुबडाची पुरी खोड मोडून टाकिली पाहिजे.

**रामभाऊ**—( बाहेर येऊन ) कुठें सांपडत नाहीं बुवा! न जाणों, त्यानें केलेली कल्पना फुकटच असेल कदाचित्!

**मथुराबाई**—( एकीकडे ) ऐकलंत ना ?

**द्वारकाबाई**—( एकीकडे ) हो ! ( उघड ) हें शोभतंना आपल्याला ?

**रामभाऊ**—हो हो, शोभतें !

**द्वारकाबाई**—पुरुषांनीं कांहीं केलं तरी तें शोभूनच जातं !

**रामभाऊ**—मोठी पतिव्रताच लागून गेली आहेस कीं नाहीं ?

**मथुराबाई**—पण भावजी, उगीच किती जिवाचा संताप करून घ्यायचा ?

**रामभाऊ**—चाललेंच आहे हो. आमचें नशीबच तसें आहे.

**गोविंदभटजी**—या हाउसमध्यें किंवा एखाद्या खोलींत, पेटींत, कपाटांत, नाहींतर वळकटींत जर कोणी माणूस निघाला, तर नांवाचा गोविंदभटजीच नाहीं !

**व्यंकप्पा**—मीसुद्धां नाहीं. इथे कुणी कुणीहि नाहीं !

**विनायकराव**—काय रामभाऊ, काय हें ? ही मोठी लांछनास्पद गोष्ट आहे बुवा ? हें काय वारें शिरलें आहे तुमच्या डोक्यांत ? छे बुवा, असला स्वभाव धर्मास नको आपल्याला !

**रामभाऊ**—ही माझ्या नशीबाची गोष्ट आहे विनायकराव ! मला त्याचे परिणाम भोंवत आहेत.

**गोविंदभटजी**—तुमच्या मनांत सस्पेक्ट आहे, ह्मणून असें होतें. तुमच्या वाइफ्सारखी बायको लाखांत आढळायची नाहीं. इतकेंच नाहीं, तर दहाजणींतसुद्धां सांपडायची नाहीं.

**व्यंकप्पा**—खरोखरच त्यांनीं फार सुंदर आहेत !

**रामभाऊ**—बरें चला. मी तुह्मांला चहा द्यायचें कबूल केलें होतें, त्याप्रमाणें आतां चहा घ्यायला चला; आणखी रात्रीं सगळ्यांनां नाटकाला नेईन. ( द्वारकाबाईस ) हें पहा, माझी चूक झाली खरी बुवा !

**द्वारकाबाई**—चूक नाहीं, मोठा थोरला खिळा झाला हा !

**रामभाऊ**—मी तुला सगळी हकीगत मागाहून सांगेन. बरें, चहाची व्यवस्था कर जा. वहिनी, तुह्मीसुद्धां राग मानूं नका हो ?

**विनायकराव**—अगोदर भलत्याच कुकल्पनांनां मनांत थारा द्यायचा, अन् मग ज्याचीत्याची माफी मागत सुटायचं.

**रामभाऊ**—बरें, आतां पुरे करा; चला.

[ जातात.

---

## प्रवेश ४ था.

[ स्थळ—कालिंदीची अभ्यासाची खोली.
शंकरराव आणि कालिंदी बोलत बसलीं आहेत. ]

**शंकरराव**—पण हें असलें सुंदर चित्र तूं काढलेंसतरी केव्हां ? एका लतामंडपांत मी बसलों आहें, आणि माझ्या मांडीवर मस्तक ठेवून तूं श्रमल्या-सारखी पडली आहेस; तुझ्या मस्तकावरील मोकळे असलेले केश वाऱ्यानें तुझ्या सुंदर मुखकमलावर उडत आहेत; डाव्या हातानें तूं ते सांवरित आहेस आणि उजव्या हातानें माझ्या डाव्या हातांतल्या आंगठीशीं खेळत आहेस, वः ! एकंदरींत ही बैठक फारच उत्तम साधली आहे बुवा. तिच्यांत कृत्रिमपणा मुळींच कसा तो दिसत नाहीं. आपल्या उभयतांच्या मुद्रातर अगदींच हुबेहुब उतरल्या आहेत. हें पलीकडच्या बाजूला कारंजें काढलें आहे, आणि त्याच्या भोंवतीं चित्रविचित्र फुलझाडें दाखविलीं आहेत. जवळच एक कमलपुष्पांनीं भरलेलें सुंदर तळें दाखवून त्यांत जलविहारासाठीं उतरलेले राजहंस देखील दाखविले आहेत. अहाहा ! तुझें हें चित्र फारच सुंदर आहे आणि ही कल्पना देखील अतिशय सुरस आहे. पण काय उपयोग! ती चित्रापुरतीच. या कल्पनेचें सुख केवळ कल्पनेनेंच अनुभविलें पाहिजे. त्याचा प्रत्यक्ष अनुभव या जन्मींतरी शक्य दिसत नाहीं.

**कालिंदी**—अगबाई! असं अगदीं निराश झाल्यासारखं बोलून कसं होईल? आपणच असे हातपाय गाळल्यावर मग मला धीर कसा यावा ?

**शंकरराव**—कालिंदी ! माझीतर बहुतेक निराशाच झाली आहे. तुझ्या वडिलांचा या बाबतींत मानस काय आहे तो मला पूर्णपणें समजून आला आहे. विनायकरावांच्या डोक्यांत सुधारणेचें असें कांहीं चमत्कारिक वेड माजून राहिलें आहे कीं, उठतां बसतां त्यांनां सुधारणा व्हावयास पाहिजे आहे. एका तडाक्यांत दोन मोठ्या सुधारणा घडवून आणण्याचा त्यांनीं संकल्प केला आहे. व्यंकप्पाला आपला जांवई करून ते ही अवघड सुधारणा घडवून आणण्याचें श्रेय संपादणार! सुधारणेच्या भरांत त्यांनां मुलीच्या सुखाचीदेखील पर्वा वाटेनाशी झाली आहे. तुझ्या आईचा जरी ओढा मजकडे असता तरीहि कांहीं आशेला जागा होती. पण त्यांचा ओढा अगदीं उघडउघड त्या सोन्याकडे दिसत आहे. कालिंदी, तुला राग

येईल कदाचित्, पण मला वाटतें त्या सोन्यापेक्षां त्याच्याजवळ असलेल्या सुवर्णा-कडेच तुझ्या आईचा ओढा अधिक दिसतो.

**कालिंदी**—अन् आपलंहि प्रेम मजपेक्षां बाबांच्या पैशावरच अधिक आहे असं लोक म्हणतात बरं!

**शंकरराव**—कालिंदी, तूंहि पण तसेंच समजतेसना? माझा तुझ्याशीं इतक्या दिवसांचा सहवास असतां तुझ्या मनांत अशी शंका यावी? मी दरिद्री आहें ही गोष्ट दुर्दैवानें खरी आहे. माझें दारिद्र्य तुझ्या प्राप्तीच्या आड येत आहे एवढ्या-साठींच मी त्याला दूषण देत आहें. पण कालिंदी, तुझी प्राप्ति होत असेल तर त्या दारिद्र्यांतदेखील मी आनंद मानून राहीन. राजाराणींचे मुखवटे काढलेल्या लाखों सोन्यारुप्याच्या तुकड्यांपेक्षां तुझ्या प्रेमाची योग्यता मी अधिक समजतों. हें सर्व तुला माहीत असूनहि तूं असें म्हणतेस, तेव्हां माझें दुर्दैव, असेंच समजलें पाहिजे.

**कालिंदी**—तुझांला वाईट का वाटलं? मी आपली हें थट्टेनं बोलल्यें हो! तुमची अन् तुमच्या प्रेमाची योग्यता न समजण्याइतकी का मी वेडी आहें? बाकी, खरंच ह्मणाल तर मी वेडी झाल्यें असतें तरबाई फार चांगलं झालं असतं. आईचा आग्रह मला सोन्याला द्यायची ह्मणून! इश्शगबाई! तो मेला मनुष्यकोटींत जन्मला आहे अन् जवळ विपुळ पैसा आहे यापलीकडे मलातरी त्याच्यांत कांहीं गुण दिसत नाहीं. मग आईला त्याच्यासंबंधीं काय वाटतं असेल तें असो. तसाच तो व्यंकप्पा. मेला शुद्ध रानवट आहे झालं! तो मोठा विद्वान् असेल, आपल्या धंद्यांत मोठा निष्णात असेल, पण मीतरी बाई त्याला शुद्ध रानवटच समजल्यें. बाबांनां वाटत आहे कीं, त्याच्यासारखा जांवई साऱ्या पृथ्वीच्या पाठीवर मिळायचा नाहीं! आईचं इकडे सोन्याबद्दल अगदीं तेंच ह्मणणं! अन् मलातर त्या दोघांची सावलीहि घेऊं नयेसं वाटतं. पण आमचं मुलींचं काय? आईबापांची लहर लागेल त्याला वरणं भाग आहे. जांवयाबरोबर जन्म घालवावयाचा असतो मुलीला, पण तो पसंत करायचा आईबापांनीं! नवरा काळा ढुस्स किंवा अगदीं घुबडासारखा कां असेना, आईबापांची तब्यत लागली कीं पोरीनं हूं कीं चूं नकरतां मुकाट्यानं त्याच्याच गळ्यांत माळ घातली पाहिजे! तो जख्खड थेरडा असला तरी त्यालाच देह वाहिला पाहिजे. तो ठोंब्या, अक्षरशत्रु, शुद्ध नंदीबैल असला तरी मोठ्या आनंदानं मुलीनं त्याजबरोबर आयुष्य कंठण्यास तयार झालं पाहिजे! आईबाप ज्या धोंड्याला

शेंदुर फांसतील त्याला देव ह्मणून पुजायाला मुलीनं बिनदिक्कत तयार झालं पाहिजे !

**शंकरराव**—पण कालिंदी, हें सगळें जरी खरें असलें तरी तुझ्यासारख्या समंजस, सुशिक्षित मुलीनें याचा प्रतिकार करण्याचें धैर्य दाखवूं नये ही केवढी आश्चर्याची गोष्ट !

**कालिंदी**—आह्मां मुलींनां लग्नाचे वेळीं तेवढी समजूतच नसते. त्यांतून समजा माझ्यासारख्या एखादीनं तसं साहस केलंच, तर ती निलाजरी, तिनं ताळच सोडला, असे नानातऱ्हेचे तिच्यावर आक्षेप यायचे. मलातरी बाबांनीं आजवर अविवाहित ठेविली अन् दोन अक्षरं शिकविलीं आहेत ह्मणूनच या गोष्टी समजत आहेत. पण समजून त्याचा उपयोग काय ? यापेक्षां मी पुरी वेडगळ झाल्यें असत्यें, तरी बरं होतं. मग मला बऱ्यावाइटांतला भेदतरी समजला नसता, आणि कोणत्याहि गोष्टीचं दुःखहि झालं नसतं.

**शंकरराव**—कालिंदी, असें नुसतें मनांतल्यामनांत चडफडून काय होणार ? तुझ्या या सुंदर मुखकमलावर दुःखाची छाया पाहिली कीं माझें अंतःकरण पराकाष्ठेचें अस्थिर होतें. सध्या आमच्या सुदैवानें जुन्या लोकांच्या मतांतदेखील कांहीं बाबतींत फरक पडत चालला आहे. परंतु जुन्या चालीरीतींनां झुगारून देऊन स्वताला वाजवी आणि श्रेयस्कर वाटणाऱ्या गोष्टी करण्याचा धीर फार थोड्यांनां होतो. तुझ्या वडिलांचें स्त्रियांनां सर्व प्रकारचें शिक्षण द्यावें हें जसें मत आहे, तसेंच सुशिक्षित मुलींनीं नवरा स्वतः पसंत करावा असेंहि अंतर्यामीं मत नसेल कशावरून ? त्या दोघांपैकीं एकहि तुला पसंत नाहीं असें तूं ह्मणत्येस, तर मग तूं ही गोष्ट आपल्या आईबापांनां स्पष्टपणें कळवित कां नाहींस ?

**कालिंदी**—बाबांच्याजवळ मला तितकं उघडपणं बोलतां येत नाहीं; पण वेळ पाहून आईचं मन वळविण्याचा प्रयत्न करण्याचा मीं निश्चय केला आहे. तुह्मींहि संधी साधून एकवार बाबांजवळ गोष्ट काढून पाहिल्यास बरं होईल.

**शंकरराव**—ठीक आहे. मी आपल्याकडून शिकस्त करून पाहीन. पण कालिंदी, या बाबतींत मुख्यत्वेंकरून तूंच धीर आणि निश्चय दाखविला पाहिजेस. ती पहा आई तुला आंतून हांक मारित आहे. मीहि येतों आतां. पण सांगितलेलें ध्यानांत धर बरें !

[ जातात.

---

## प्रवेश ५ वा.

[ **स्थळ**—विश्रांतिभवन. मुकुंदराव व जगन्नाथ बोलत बसले आहेत. ]

**मुकुंदराव**—जग्या ?

**जगन्नाथ**—काय हुकुम आहे ?

**मुकुंदराव**—और एक बंपर भरून चहा घेऊन ये जा. ( जगन्नाथ जातो. ) केरकचरा ह्मणून त्या घाणेरड्या पेटींत जाऊन पडायचें माझ्या कपाळीं यावें ना? चांगली अद्दल घडली! पुन्हा जर मी असा फसलों, तर या मठ्ठ डोक्यांतला मेंदु काढून त्याचें लोणचें घालून ठेवीन. नाहींतर तो तुपांत तळून कुत्र्यांनां चारीन. त्या हरामखोरांनीं बेलाशक कीं हो मला त्या पेटींत फेंकून दिलें! पण त्या बिचाऱ्यांचा तरी काय दोष? जिवंतपणीं अगदीं शब्दशः नरकवास भोगला बुवा तिथें.

**जगन्नाथ**—(चहा घेऊन येतो) या सखूबाई आपल्याला भेटायला आल्या आहेत.

**मुकुंदराव**—आधीं तो चहा इकडे आण, आणि मग तिला बोलाव.

**जगन्नाथ**—याहो बाई, आंत या.

**सखू**—( प्रवेश करून ) रावसाहेब, मला आपल्या समाचाराला पाठविलं आहे. आपण बरे आहां ना ?

**मुकुंदराव**—जग्या, हा चहा बुवा अगदींच पिळपिळीत! आणखी एक बंपर भरून फक्कडसा घेऊन ये पाहूं?

**जगन्नाथ**—थोडी वेलची सोडूं का त्याच्यांत ?

**मुकुंदराव**—हो, वेलची सोड! केशर, बदाम, पिस्ते, मनुका नकोत का आणखी?

**जगन्नाथ**—बरें, साधाच आणतों. [ जातो.

**सखू**—मी द्वारकाबाईकडून आल्यें आहें.

**मुकुंदराव**—फार चांगलें केलेंत बरें? मला द्वारका घडली, मथुरा घडली, काशी, गया, प्रयाग साऱ्या तीर्थांचा वास घडून हा आत्तांच परत आलों !

**सखू**—चत् चत्! त्याच्यांत त्या बिचारीचा काय बरं अपराध? त्यांनां अगदीं हें झाल्यासारखं झालं आहे हो !

**मुकुंदराव**—तें कांहीं असो. मलातर त्या अष्टघाणींत पडावें लागलें ना ?

**सखू**—पण तसं केल्यावांचून दुसरा उपायच नव्हता. त्यांनां असं खजील झाल्यासारखं झालं आहे, कीं तें पाहून तुमचं हृदय तीळतीळ तुटेल. त्यांचा नवरा आणि ती मंडळी आज रात्रीं कुठल्याशा नाटकाला जाणार आहेत; तेव्हां रात्रीं कांहीं सकाळच्यासारखं विघ्न खास येणार नाहीं. आपण रात्रीं नवांच्या पुढें

अगदीं जरूर जरूर यायचं; नाहीं ह्मणायचं नाहीं हो ! केव्हां एकदाची रात्र पडेल, अन् आपले पाय घट्ट धरून केव्हां आपली माफी मागेन, असं झालं आहे त्यांनां. आपला निरोप आत्तांच्या आत्तां त्यांनां जाऊन कळविला पाहिजे.

**मुकुंदराव**—बरें; सांगा तिला मी येईन म्हणून. पण मी ह्मणूनच कबूल झालों हो! नाहींतर एखादा मानी स्वभावाचा असता, तर तिनें प्राण सोडला असता तरी वळला नसता. पण माझें हृदय पडलें कोंवळें, ह्मणूनच मी पुन्हा यायला तयार झालों. एवढ्यावरून माझी कायती पारख कर ह्मणावें.

**सखू**—मीं ह्मटलंच कीं, आपण कांहीं त्यांच्याशीं निष्ठुरपणानं वागणार नाहीं. त्या अगदीं माझ्या वाटेकडे डोळे लावून बसल्या असतील. त्यांनां सांगूं ना मी आपण यायला चुकणार नाहीं ह्मणून ?

**मुकुंदराव**—अगदीं बेलाशक सांगा जा. दहांच्या पुढें म्हणालांत नाहींका?

**सखू**—छे छे, इतका उशीर कशाला ? नवांच्या पुढं हव्वे तेव्हां या.

**मुकुंदराव**—होय का? बरें, तुह्मी जा आतां. मी साडेनवांच्या तोफेला तिथें ठेवलेला आहें, ह्मणून द्वारकाबाईला सांगा जा.

**सखू**—सांगलें हो ! बरं घेलें मी आतां निरोप. [ जाते.

**मुकुंदराव**—तो विसाजीपंत कां आला नाहीं बुवा अजून ? घरांत रहाण्याबद्दल मला त्याचा निरोपदेखील आला आहे. आज किती विसांवर डल्ला मारायला सांपडतो आहे पहावें. अरे ! हा पहा, आलाच हा.

( वेषांतर केलेले रामभाऊ प्रवेश करतात. )

**मुकुंदराव**—नमस्कार विसाजीपंत, बसा. त्या रामभाऊच्या गृहस्थीच्या आणखी आमच्या दरम्यान काय काय झालें तें विचारायला आलां असाल तुम्ही?

**रामभाऊ**—उघडच आहे.

**मुकुंदराव**—हें पहा विसाजीपंत, मी कशाला तुमच्याशीं खोटें बोलूं ? तिनें सांगितलेल्या वेळीं मी तिच्या घरीं गेलों होतों.

**रामभाऊ**—मग पुढें काय झालें ?

**मुकुंदराव**—तें कांहीं विचारूं नका बुवा ! माझ्या फजितीला अगदीं पारावार नाहीं.

**रामभाऊ**—तें कसें काय ? तिचें मन पुन्हा फिरलें का काय ?

**मुकुंदराव**—तसें नाहीं हो; पण तो तिचा नवरा आहेना हजाम ? तो मोठा शंकेखोर आहे बघा. रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून बायकोच्या अगदीं पाळतीवर

बसलेला असतो. अहो काय सांगूं तुह्मांला विसाजीपंत ? मला पाहिल्याबरोबर तिला इतका कांहीं आनंद झाला कीं, विचारूं नका! तिनें माझें मोठ्या प्रेमानें आगतस्वागत केलें, माझी बरीचशी स्तुति गायिली, मीं तिच्या विनंतीस मान दिल्याबद्दल माझे आभार मानिले, व आतां प्रेमाच्या गोष्टी बोलणार इतक्यांत आला कीं तो मशालजी घर शोधायला ! त्याच्याबरोबर त्याचे दुसरेहि कांहीं स्नेही होते.

**रामभाऊ**—काय, तो आला तेव्हां तुह्मी त्याच्या घरांतच होतां ?

**मुकुंदराव**—अहो होय ना! सांगतों काय ?

**रामभाऊ**—मग काय ? त्यानें तुह्मांला शोधलें, पण तुह्मी सांपडलां नाहीं ?

**मुकुंदराव**—ऐकून तर घ्या. काय योगायोग असेल तो असो, मथुराबाई ह्मणून एक आहे, तिनें तो महारडा येत असल्याची खबर दिली बघा. त्याबरोबर द्वारकाबाईची जी त्रेधा उडाली आहे म्हणतां? तिला कांहींच सुचेनासें झालें. पण त्या मथुराबाईनें एक शक्कल काढली बुवा ! तिनें लागलीच मला एका बुरडी टोपलींत बसवून बाहेर काढलें.

**रामभाऊ**—काय, बुरडी टोपलींत ?

**मुकुंदराव**—हो हो. मी कसातरी आंग चोरून तिच्यांत बसलों, अन् मग त्यांनीं केरकचरा आणि एक किडे पडलेला बुरणूस माझ्या अंगावर घातला. अरे राम ! कोण ती दुर्गंधी ! मला अजून तिच्या ओकाऱ्या येत आहेत !

**रामभाऊ**—मग तुह्मी किती वेळ होतां त्या पांटीमध्यें ?

**मुकुंदराव**—सांगतों, सारें सांगतों. विसाजीपंत, तुमचा हेतु पूर्ण करावा ह्मणून तिला वाईट मार्गाला लावण्यासाठीं मला किती हालअपेष्टा भोगाव्या लागल्या आहेत ह्मणतां ? मला पांटींत कोंबल्यावर द्वारकाबाईनें आपल्या दोन गड्यांनां हांक मारली; इतक्यांत त्या न्हावगंड्याचें पाऊल दारांत पडलें, आणि तो लागला त्यांनां पांटींत काय आहे म्हणून दरडावून विचारायला. तेव्हां माझी जी काय तिरपिट उडाली आहे ह्मणतां ? मीं ह्मटलें, आतां हा प्राणी खास बुरणूस उसकटून पहातो आहे ! पण माझें नशीब बलवत्तर, त्यानें त्याचा हात धरला. तो रामभाऊ घरांत मला शोधायला गेला, आणि आमचा 'राम बोलो' केर ह्मणून पेटींत पडायला गेला. काय माझे हाल विचारतां, विसाजीपंत ! तेवढ्या अवकाशांत मी तीनदा मरतां मरतां वांचलों ! तो रामङ्क आपल्याला पकडणार असें वाटल्याबरोबर जी माझी घाबरगुंडी उडाली आहे, आणि उरांत जी धडकी

भरली आहे, ती माझी मलाच ठाऊक! मीं ह्मटलें, आतां छाती फुटून मरतों खास. इतक्यांत–तें किती दिवसांचें गदळ होतें कुणास ठाऊक! –त्याच्यांतल्या एका विंचवानें असा फणकारा मारला आहे ह्मणतां, मला सारें ब्रह्मांड दिसूं लागलें! एखादा मेषपात्र असता तर त्या वेदनांनींच राम ह्मणता. बरें, एवढ्यानेंच निभावलें आहे का? ते चाकर बेटे किती वेळतरी मला घेऊन चाललेच होते. त्या पाटींत मला अगदीं चिणून टाकलें होतें. तिथें नाहीं काडीभर हलायला जागा, अन् घाण म्हणजे काय मी म्हणत होती! मला अतीशय उकडायला अन् गुदमरायला लागलें. ह्मटलें आतां हवेवांचून प्राण जाणार. पण दम कोंडून मी मेलों कसा नाहीं, याचेंच मला नवल वाटतें. शेवटीं त्यांनीं एका केराच्या पेटींत आमचें विसर्जन केलें! तेव्हां कुठें नाकपुड्यांत थोडी हवा शिरली. मग रस्त्यावर आसपास कोणी नाहीं असें पाहून घरीं यःपलाय करावें, ह्मणून पुष्कळ यत्न केला; पण रहदारी मुळींच कमी होईना. तेव्हां ह्मटलें, आतां रात्र पडेपर्यंत इथल्याइथेंच उष्ट्या पत्रावळी अन् शेणगोळे, आणखी आमच्याबरोबरचें सडकें मांजर यांच्या सोबतींत वेळ घालवावा; आणि मग मुकाट्यानें कोणाला नकळत उठून घरीं जावें. त्याप्रमाणें हा आत्तांच इथें येऊन टेकलों. पण अंधार पडेपर्यंत आमच्या अंगावर काय काय पदार्थांचा वर्षाव झाला आहे ह्मणतां? त्यांचा जर तुह्मांला नुसता तपशील सांगितला, तर तुह्मी किळस येऊन ओकाऱ्या देऊं लागाल. विसाजीपंत, या सगळ्या यातना तुमच्याकरतां बरें? कुठून मी दुसऱ्यावर उपकार करायला गेलों, असें मला होऊन गेलें.

**रामभाऊ**—माझ्यापायीं आपल्याला इतके क्लेश काढावे लागले, याबद्दल मला फार फार वाईट वाटत आहे. पण आपल्याला ज्याअर्थीं अशाप्रकारची ठेंच लागली आहे, त्याअर्थीं आपल्या हातून माझें काम फत्ते होण्याची आतां आशा नाहींच ह्मणायची?

**मुकुंदराव**—तें कां? तुह्मांला सांगतों विसाजीपंत, तिनें मला केराच्या पेटींत नाहीं संगमांत, नाहींतर आगगाडीच्या बंबांत टाकलें, तरी तिला मी आतां तशी ह्मणून सोडणार नाहीं, हें तुह्मी अगदीं पक्कें समजा! आत्तां तिचा नवरा जाणार आहे म्हणे नाटकाला. तेव्हां 'रात्रभर आपलेंच राज्य आहे, तुम्ही हजार अडचणी बाजूला ठेवून आलेंच पाहिजे,' असा तिचा नुक्ताच निरोप आला आहे. नाटक केव्हां साडेनवांला सुरू होतें, नाहीं का?

**रामभाऊ**—होय. आपल्याला तिनें किती वाजतां बोलावलें आहे?

**मुकुंदराव**—अहो तिचा नवरा बाहेर गेला, ह्मणजे त्या अदमासानें जायचें, दुसरें काय ?

**रामभाऊ**—आतां नऊ वाजून गेले आहेत. तेव्हां तो बहुतेक थेटरांतसुद्धां जाऊन पोहोंचला असेल.

**मुकुंदराव**—काय नऊ वाजून गेले ह्मणतां ? तर मग मला जायच्या तयारीला लागलें पाहिजे. तुह्मी आतां जा, आणखी केव्हां सवड असेल तेव्हां या. मग कसा काय वार उडतो, तें तुह्मांला सांगेन. मी ती तुह्मांला मिळवून देणार हो, तुह्मी अगदीं काळजी करूं नका. त्या रामभाऊच्या डोळ्यांत धूळ टाकून आपण त्याची बायको भ्रष्ट करणार. बरें, कायहो, तुम्हांला सांगितलेली रक्कम आणलीत का ?

**रामभाऊ**—हो, ही तयार आहे.

**मुकुंदराव**—आणातर इकडे, नमस्कार. [ थैली घेऊन जातो.

**रामभाऊ**—हरहर ! काय हें ? मी झोंपेंत, स्वप्नांत तर नाहीं ना? अरे मूर्खा रामभाऊ! सावध हो, डोळे उघड. धडधडीत तुला सांगूनसवरून तुझ्या घरावर दरोडे पडायला लागले; अजूनतरी जागा हो. हें लग्न केल्याचें फळ बरें ! हे घरांत बुरणूस आणखी टोपल्या बाळगण्याचे परिणाम ! यापुढें कोणींहि लग्न करूं नये; केलेंच तर निदान बुरणूस आणि टोपल्यातरी घरांत बाळगूं नयेत ! छे, आतां आपलें खरें स्वरूप प्रगट केलेंच पाहिजे. हा हरामखोर आत्तां माझ्या घरीं जाऊन पोहोंचेल. आतां निसट ह्मणावें माझ्या हातून ? या खेपेला माझ्या तावडींतून कुठें जातोस तें पहातों ! हळदीकुंकवाच्या डब्यांतूनतर नाहीं ना लपून पळून जायचास ? मी नाहीं नाहीं तीं ठिकाणें उलथींपालथीं करून पाहीन व तुझी हड्डी नरम करीन.

[ जातात.

[ पडदा पडतो. ]

## अंक ४ था.

### प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—रामभाऊंचें घर. मुकुंदराव व द्वारकाबाई बोलत बसलीं आहेत. ]

**मुकुंदराव**—द्वारकाबाई, तुह्मांला वाईट वाटत आहे, हें पाहून मला झालेला त्रास अन् फजिती मी पार विसरलों, समजलांत? तुह्मी आपल्याला मुळींच वाईट वाटूं देऊं नका. तुमची माझ्याठिकाणीं निस्सीम प्रीति आणि भक्ति आहे, हें मी पुरतेपणीं जाणून आहें. त्याचप्रमाणें माझेंहि तुमच्यावर खरेंखुरें प्रेम आहे, याबद्दल माझ्या वर्तनावरून तुमची खात्री होऊन चुकलीच असेल. अशा तऱ्हेनें एकमेकांचें एकमेकांवर प्रेम असल्यानंतर आणखी हो काय पाहिजे? तेवढें तें तुमच्या नवऱ्याचें शुष्ककाष्ठ मध्यें नसतें, तर सोन्याहून पिवळें झालें असतें! निदान आतांतरी त्याच्या येण्याची भीति नकोना बाळगायला?

**द्वारकाबाई**—नको बरें, मुळींसुद्धां नको. नाटक संपायलाच आधीं अडीच वाजंतील. तोंपर्यंत कुणी चिटपांखरूंहि फिरकायचं नाहीं इकडे.

**मथुराबाई**—( पडद्यांत )—द्वारकाबाई, अहो द्वारकाबाई?

**द्वारकाबाई**—कोणतरी मेला त्रास! उठा उठा, आपण या पलीकडच्या खोलींत व्हा पाहूं लवकर?

( मुकुंदराव लपतो. व मथुराबाई प्रवेश करते. )

**मथुराबाई**—कां द्वारकाबाई, आणखी कोण कोण आहे घरांत?

**द्वारकाबाई**—कोण कोण ह्मणजे? तिकडे नाटकाला जायचं झालं आहे. बाकी आहेत तीं घरांतलींच माणसं आहेत. बाहेरचं कुणी नाहीं!

**मथुराबाई**—खरंच ना पण?

**द्वारकाबाई**—खरंच तर काय खोटं वाटतं?

**मथुराबाई**—तसं नाहीं हो! पण बाहेरचं कुणीं नाहीं म्हणालांत हें पाहून मला फार समाधान वाटलं.

**द्वारकाबाई**—तें कां बाई?

**मथुराबाई**—कां होय? तुमच्या यजमानांच्या डोक्यांत पुन्हा भूत शिरलं आहे, ठाऊक आहे का? रामभाऊ आल्याबरोबर नाटकाला जायचं, ह्मणून तिकडे जेवणखाण आटपून कपडेसुद्धां अंगांत घालून ठेवले. पण ह्या स्वारीनं आल्याबरोबर लग्नावर आणि बायकांच्या जातीवर जी तोंड सोडायला सुरुवात केली आहे म्हणतां, त्याला ताळ ना तंत्र! तें थेटरांतलं नाटक राहिलं थेटरांतच, अन्

आमच्या घरीं हें दुसरंच नाटक सुरू झालं. छे बाई! मीं आजपर्यंत पुष्कळ नाथेफिरू लोक पाहिले, पण तुमच्या नवऱ्याचा आजचा संताप कांहीं बेसुमारच! ते मुकुंदराव आतां इथं नाहींत, म्हणून मला फार बरं वाटत आहे.

**द्वारकाबाई**—कां बरं? त्यांचं नांव काढलं का काय त्यांनीं?

**मथुराबाई**—अहो, सारखी लाखोली झडत आहे त्यांच्यावर! ते म्हणत आहेत कीं, सकाळीं आपण जेव्हां त्याला शोधायला गेलों, तेव्हां तो पांटींत बसून नेसटला. बाई आपण इतकी खबरदारी घेतली, तरी कसं त्यांनां कळलं कुणास ठाऊक? आणखी मौज सांगूं का तुम्हांला? ते अगदीं प्रतिज्ञेवर सांगत आहेत कीं, तो महार, मांग, धेड, चांभार, भंगी या घटकेला आपल्या घरीं खास आहे. आणखी एकदा आपली शंका फेडून घ्यायची आहे, तेव्हां तुम्ही पुन्हा आपल्या बरोबर चला' असं म्हणून ते त्या साऱ्या मंडळीला इकडे ओढून घेऊन यायला लागले आहेत. यानात का म्हणावं खुश्शाल? एकदा सोडून सतरांदा या. ते रावसाहेब इथं नाहींत हें ऐकून मला कितीपण समाधान वाटलं म्हणून सांगूं?

**द्वारकाबाई**—ती मंडळी कुठवर आली असेल बरं?

**मथुराबाई**—अहो, कुठवर काय विचारतां? ते निघाले असं पाहून मी धावत धावत इकडे आल्यें. एव्हांना आलेहि असतील या आपल्या गल्लीच्या नाक्यावर. आत्तां इथं येऊन धडकतील बघा!

**द्वारकाबाई**—खरंच का? अगबाई! आतां काय करूं? मथुराबाई, माझी अब्रु वांचवा हो! ते रावसाहेबतर इथंच आहेत.

**मथुराबाई**—काय म्हणतां? शर्थ आहे बाई तुमची! मग कुणी नाहीं असं मघां काय म्हणालांत? आतां आटपलाच ग्रंथ! आतां तुमची फटफजीती अन् त्यांचा कपाळमोक्ष! काय बाई तुम्हांला म्हणावं? पळवा, आतां पळवा त्यांनां कुठंतरी! तुमचं बदनाम झालेलं पुरवलं, पण कुणाचे खून नकोत पडायला इथं.

**द्वारकाबाई**—आतां पळवूंतरी कसं बाई? आणि कुणीकडे पळवूं? पुन्हा त्या पांटींत लपवून बाहेर लांबवूं?

**मुकुंदराव**—(प्रवेश करून) माझे आई, माफ करा! त्या पांटींत म्हणून पुन्हा मी बसायचा नाहीं. ते दाराशीं पोहोंचायच्या आंत मला त्यांनां झुकांडी देऊन नाहीं का जातां यायचें?

**मथुराबाई**—कपाळ! अहो त्यांनीं पुढल्या आणि मागल्या दारांशीं दोन दोघे भय्ये उभे केले आहेत हातांत सोटे देऊन! आणखी त्यांनां सांगून

आहे कीं, कुण्णालाहि बाहेर सोडूं नका ह्मणून. आतां जर तुह्मी निसटून जायच्या भरीस पडलांत, तर मग तुमची पुरीच कंबख्ती. ते पुरभय्ये मेले मोठे कडवे असतात. ते तुमचे ठिकरीएवढे तुकडे करतील. पण घरांत राहूनतरी कसं चालेल?

**मुकुंदराव**—आईग! सांगा सांगा लवकर, मग काय करूं ह्मणतां? मला घरांतच कुठेंतरी लपवा.

**द्वारकाबाई**—बळदांत दडून बसतां का?

**मुकुंदराव**—हो हो, दाखवा लवकर!

**मथुराबाई**—पण नको बाई, तिथं नको विंचूकांट्याचं. एखाद्या मोठ्या फडताळांत बसतां?

**मुकुंदराव**—कुठें सांगाल तिथें बसतों, पण लौकर आटपा.

**द्वारकाबाई**—नको बाई, फडताळांतदिखील नको. तिथं ते खास शोधतील. शौचकूपांत बसतां?

**मुकुंदराव**—वा जि वा! हें ठिकाण सुरेखच काढलेंत!

**मथुराबाई**—पण नको. तिथेंसुद्धां नको. अशा ठिकाणींतर ते हटकून शोधायला जायचे. पेट्या, फडताळं, वळकट्या, धान्याच्या कणंगी, अशा ठिकाणीं ते बिनचुक टेहळून पहातील. आपल्याला घरांत लपवायची मुळींच सोय नाहीं.

**मुकुंदराव**—मग आतां मी काय करूं? आपला बाहेरच जातों कसा!

**मथुराबाई**—असेच्या असेच जर तुम्ही बाहेर गेलांत, तर ते पुरभय्ये तुमच्या नखाचा नाहीं मागमूस लागूं द्यायचे. कांहींतरी वेषांतर करून जर—

**द्वारकाबाई**—हो जि हो! नामी युक्ति काढलीत. पण यांनां वेष कसला द्यावा?

**मथुराबाई**—तें बाई आतां मीतरी काय सांगूं? तुमचीं लुगडीं यांनां लांडीं होतील; नाहींतर एखादं लुगडं नेसवून डोक्यावर पदरबिदर देऊन बाहेर लावतां आलं असतं.

**मुकुंदराव**—हें बरें दिसत आहे बुवा! करा, माझे आयांनों कांहींतरी उपाय करा. काय हवें तें पत्करेल, पण निजधामाला जाणें नको इतक्यांतच.

**द्वारकाबाई**—ठकू मोलकरणीचं लुगडं बरंच लांबरुंद आहे. खालीं न्हाणी-पाशीं दांडीवर वाळत आहे. मात्र जरा फाटकं आणि घाण झालेलं आहे.

**मथुराबाई**—बरं मग दुसरं नसलंच तर काय करायचं?

**द्वारकाबाई**—मग नेसवूंया तेंच अन् काय? हो, मला आणखी एक युक्ति सुचली आहे. मी किनइ एकदोनदा त्या वाराणशीबाई देवऋषिणीला अशीच रात्रीच्या वेळीं कांहीं प्रश्न विचारायला घरीं बोलावली होती. ही गोष्ट आमच्या

घरांत समजल्यावर, असले वेडेचार केले ह्मणून फार राग आला; तिला पुन्हा घरांत न घेण्याबद्दल मला सक्त ताकीद झाली; आणखी 'आमच्या घरांत पुन्हा येशील तर तंगडीच लंगडी करीन' ह्मणून तिलादिखील बजावून सांगणं झालं. ही सगळी हकीगत तुह्मांला माहित आहेच?

**मथुराबाई**—हो, आहे माहीत. पण त्याचं काय.

**द्वारकाबाई**—तिची अन् यांची उंची, अंगाचा विस्तार, चालण्याची ढब वगैरे गोष्टी बहुतेक जुळण्यासारख्या आहेत. तेव्हां हे त्यांच्या नजरेस पडून जर त्यांनीं ही कोण म्हणून विचारलं,तर देवऋषीणबाई आहेत ह्मणून सांगून टाकूं, ह्मणजे झालं. शिवाय पोटीं पोर नसल्याबद्दल परवांच आमच्या गोष्टी निघाल्या होत्या; तेव्हां देवऋषीणबाईचा संबंध त्यांनां अगदीं सयुक्तिक वाटेल.

**मथुराबाई**—खाशी तोड काढलीत. वेळ आली तर अशीच बतावणी करावी.

**द्वारकाबाई**—होयना? मग जा तर रावसाहेब तुह्मी खालीं न्हाणीपाशीं. मी एखादं जुनं धोतर घेऊन येत्यें तुह्मांला पांघरायला. तोंपर्यंत ही कात्री घेऊन आपल्या मिशाबिशा साफ कातरून ठेवा.

**मथुराबाई**—हूं, चला, घुटमळूं नका आतां. आह्मी या आलोंच तुमच्या पाठोपाठ तुह्मांला लुगडं नेसवायला.

**मुकुंदराव**—ठीक आहे. 'आलीया भोगासी असावें सादर'! [ जातो.

**द्वारकाबाई**—आतां हें ध्यान तिकडच्या नजरेस पडलं पाहिजे, ह्मणजे त्याच्यावर यथास्थित पुष्पांजळी होईल.

**मथुराबाई**—पुष्पांजळीच कां? लाथांजळी, खेटरांजळी, सगळं कांहीं होईल. जयदेवा! भावोजींनां आपल्या हातांतली काठी कुठं विसरून येऊं देऊं नकोस.

**द्वारकाबाई**—ह्मणजे? ते खरोखरच येत आहेत कीं काय?

**मथुराबाई**—अगदीं खरं! आणखी ते पांटीच्यासुद्धां गोष्टी बोलत आहेत. मग कुठून त्यांनां सारी तार पोहोंचत असेल ती असो बाई! आपण त्या डुकराला ज्या थापा मारतों त्या आपल्या सगळ्या खऱ्या होत आहेत!

**द्वारकाबाई**—बरं पाहूं आपण तुह्मी म्हणतां त्याची प्रचीती. गड्यांनां सकाळच्यासारखी पांटी घेऊन जायला आणि स्वारीला नेमकं दरवाजांत भेटायला सांगून येत्यें, ह्मणजे झालं.

**मथुराबाई**—पण ते आतां अगदीं यायला झाले. अगोदर त्या जहागिरदारांनां खोपाटं दिला पाहिजे ना?

**द्वारकाबाई**—ही मी गड्यांनां पढवून धोतर घेऊन आल्येंच ह्मणून समजा. तुह्मी पुढं व्हा इव्यातर. [ जाते.

**मथुराबाई**—( स्वगत ) मेला मांग, राक्षस! चांगले धिंडवडे काढले पाहिजेत याचे. मेल्याचा किती जरी छळ केला तरी पुरे होणार नाहीं. आह्मी आपल्या या कृतीनं सुशिक्षित बायकांनां आपलं पातिव्रत्य राखूनहि मोठ्या गमतीनं असल्या विषयांध नीच मांगांनां ताळ्यावर कसं आणतां येतं, हें जगाच्या पुरतेपणीं नजरेस आणून देऊं. आमच्याप्रमाणं ज्या बायका आनंदी आणि विनोदी स्वभावाच्या असतात, ज्यांनां थट्टाविनोद करणं आवडतं, ज्या पुरुषांशीं मोकळेपणानं बोलतातचालतात, त्यांचं वर्तन स्त्रीस्वातंत्र्यद्वेष्ट्यांस जरी फाजील, बेमर्यादेचं आणि नांव ठेवण्याजोगं वाटलं, तरी वास्तवीक त्याच सच्छील असतात. पण वरपांगी ज्या उसन्या मर्यादशीलपणाचा आणखी नसत्या लज्जेचा आव आणतात, जरूरीचा प्रसंग आला तरी पुरुषांचं वारंदिखील लागूं द्यायचं नाहीं असा आपला निर्धार आहे असें दाखवितात, ज्या दुसऱ्यांबद्दल भलत्यासलत्या कंड्या पिकवून आपल्या साध्वीपणाचा आपणच डांगोरा पिटतात, त्यांच्या तिथें खास कांहींतरी पाणी मुरत असतं, ह्मणून समजावं.

( द्वारकाबाई व दोन चाकर प्रवेश करितात. )

**द्वारकाबाई**—अहो? तुह्मी अजून इथंच का?

**मथुराबाई**—बरं, होत्यें मी पुढं. [ जाते.

**द्वारकाबाई**—( चाकरांस ) हूं, उचला ती टोपली. अगदीं जवळ यायचं झालं असेल. त्यांनीं जर ती खालीं उतरायला सांगितली, तर मुकाट्यानं तसं करा, आटपा. [ जाते.

**पहिला चाकर**—हूं, लावा हात, उचला.

**दुसरा चाकर**—या बारीलाबी रावसाब नसत्याल ना भरल येच्यामंदी?

**पहिला चाकर**—मंग तिक्त शिस व्हाउन न्येलेल काय वाईट?

( रामभाऊ, विनायकराव, गणपतराव, व्यंकप्पा व गोविंदभटजी येतात. )

**रामभाऊ**—पण हें जर खरें ठरलें, तर मग कांहीं बाकी उरली आहे का? (चाकरांस) अरे ए गधड्यांनों, खालीं ठेवा ती पांटी, अन्, एकजण तिला हांक मारा इकडे. अरे कुंटण्यांनो! सगळ्यांनींच लेकांनीं संगनमत केलें आहे नाहीं? सारेजण तिला सामील झाले आहेत. आत्तां तुमचें बिंग बाहेर काढतों बघा. आलीस का नाहीं ग, ए? चल पुढें ये पाहूं अशी? आत्तांसुद्धां हा माळ्यावरचा केरकचराच चालला असेल नाहींका बाहेर?

**विनायकराव**—कमाल झाली बुवा आतां! तुम्हांला यापुढें मोकळे सोडायची मुळींच सोय राहिली नाहीं. वेड्याच्या इस्पितळांतच टाकलें पाहिजे!

**गोविंदभटजी**—नाहींतर काय? हा शुद्ध हाफ्‌म्याड्‌पणा आहे.

**व्यंकप्पा**—थेट खूळ धरलेल्या कुत्र्याच्या तस आहे.

**गणपतराव**—रामभाऊ, हें कांहीं चांगलें नाहीं बुवा!

**रामभाऊ**—खरोखरच चांगलें नाहीं. मीतरी तेंच म्हणतों. (द्वारकाबाई प्रवेश करते.) यावें बाईसाहेब! या. तुह्मी मोठ्या पतिव्रता, मोठ्या मर्यादशील, मोठ्या सद्गुणी, मोठ्या साध्वी आहां; आणखी तुमचा नवरा भ्रमिष्ट आणि शंकेखोर आहे, त्याला चळ लागला आहे; नाहींका? सीता,तारा न् फारा,साऱ्यांनीं तुमचीं लुगडीं धुवावींत, अशी तुमची योग्यता असूनहि मी फुकट शंका घेतों—

**द्वारकाबाई**—माझ्या आचरणाबद्दल जर इकडे कांहीं विकल्प आला असला, तर तो खरोखरच फुकट आहे. अगदीं ईश्वरसाक्ष सांगत्यें.

**रामभाऊ**—अरे वारे बेशरम! ईश्वरसाक्ष सांगतेस नाहीं? पहा बरेंका, बदलशील. चलो निकलो बहार. मी तुला थोडीशी जादू करून दाखवतों. चल—चल—चल—(पांटींतील कचरा, चिंध्या वगैरे बाहेर उपसूं लागतात.)

**विनायकराव**—आतां मात्र शिकस्त झाली!

**द्वारकाबाई**—मेली मनाची नाहीं पण जनाचीतरी बाळगायची होती थोडी? इश्श, तो केर कशाला उपशित सुटायचं?

**रामभाऊ**—आत्तां बाहेर काढतों बघ तुला!

**गोविंदभटजी**—हें काय आरंभलें आहे तुह्मीं? तुमच्यासारख्या एज्युकेशन लोकांनां हें मुळींच शोभत नाहीं. जळूंद्या तें गदळ. चला, तिकडे नाटकाचा एक अंकदेखील होऊन गेला असेल.

**रामभाऊ**—ती पांटी रिकामी करा पाहूं आधीं!

**द्वारकाबाई**—ती कशासाठीं?

**रामभाऊ**—विनायकराव, माझी अगदीं सोळा आणे खात्री आहे कीं, आज सकाळीं हिनें ह्याच पांटींतून एका माणसाला बाहेर लांबविलें. तेव्हां आतांहि तो तिच्यामध्यें नसेल कशावरून? तो या मिनिटाला माझ्या घरांत आहे, याबद्दल तर संशय नाहींच. मला अगदीं बित्तम बातमी लागली आहे. माझ्या शंकेला सबळ कारणें आहेत, समजलांत? चला, काढा त्या साऱ्या चिंध्या.

**द्वारकाबाई**—त्याच्यांतून जर कुणी माणूस बाहेर निघाला, तर बेलाशक त्याला अन् मला सुळावर चढवा.

**विनायकराव**—कुठें कोण आहे यांत ?

**गणपतराव**—छे बुवा, हें अगदीं गैरशिस्त आहे. रामभाऊ, तुह्मांला ही गोष्ट फार लाजिरवाणी आहे.

**गोविंदभटजी**—तेंच म्हणतों. रामभाऊ, आतां हे मॅडनेस चाळे सोडून द्या.

**रामभाऊ**—( पांटींतून एक कुत्रें निघतें तें पाहून ) अरे हें काय भलतेंच ! मी ज्याला पहात होतों तो कुठें गेला ?

**विनायकराव**—तो इथेंहि नाहीं, आणि कुठेंहि नाहीं. फक्त तुमच्या या नासक्या डोक्यांत आहे !

**रामभाऊ**—हें पहा, इतक्यांतच माझ्यावर उठूं नका. एवढी एक वेळ माझ्याबरोबर घर धुंडाळायला चला. ज्याला मी हुडकित आहें तो जर सांपडला नाहीं, तर हवीतशी माझी फटफजीती उडवा. माझें अगदीं तोंडींलावणें करून सोडा. कोणा शंकेखोराला उपमा द्यायची झाली, तर माझी द्या. पण आत्तां माझ्या लहरी-प्रमाणें घरांत शोधायला या.

**द्वारकाबाई**—मथुराबाई, तेवढ्या त्या वाराणशीबाईंनां घेऊन खालीं या हो. ह्या मंडळीला तिकडे यायचं आहे.

**रामभाऊ**—वाराणशीबाई ? कुठल्या वाराणशीबाई ?

**द्वारकाबाई**—त्या देवऋषीणबाई नव्हत्या का त्यादिवशीं आल्या ?

**रामभाऊ**—कोण ? ती बुड्डी ढमाली जखीण का ? त्या चेटकीला सटवीला पुन्हा घरांत घेऊं नकोस ह्मणून मीं तुला बजावलें होतें ना ? कुंटणगिरीचा धंदाहि करते वाटतें ती ? देवऋषीपणांत कोणकोणते धंदे मोडतात कुणास ठाऊक ? आह्मांला भोळ्या माणसांनां तें काय कळणार ? हे देवऋषी न् पंचाक्षरी ह्मणजे सारें थोतांड आहे. माझ्या घरांत त्यांचें स्तोम माजविलेलें मला मुळींच खपणार नाहीं ! तुला मुलगी झाली नाहीं तर जग ओस पडणार नाहीं. तूं तिच्या नादीं लागूं नको असें मी तुला दहादहादां बजावून सांगितलें होतेंना ? मग कां तूं तिला पुन्हा इथें आणलीस ? अग ए थेरडे, हडळी, चल बाहेर ये. आलीस का नाहीं अजून ?

**द्वारकाबाई**—पुन्हा कद्धीं तिला घरांत पाऊल ठेवूं देणार नाहीं हो ! भटजी, हे आतां त्या बिचारीची पाठ सडकतील बरं ? तेवढं करूं देऊं नका त्यांनां.

( स्त्रीवेष घेतलेला मुकुंदराव व मथुराबाई येतात. )

**मथुराबाई**—जपून चला हो देवऋषीणबाई ? मी हात धरूं का तुमचा ?

**रामभाऊ**—या, हळू या; मी देवाच्या घरची वाट दाखवतों बरें का तुह्मांला! ( मुकुंदरावास काठीनें धोपटतात.) चल नीघ, हो बाहेर! जखीण, हडळ, चेटकी, हेडंबा, पखालपार्वती कुठची! येशील का पुन्हा इथें, अं ? [ मुकुंदराव जातो.

**मथुराबाई**—इश्श ! काय बाई ह्मणावंतरी आतां ? त्या बिचारीचा जीवसुद्धां गेला असेल.

**द्वारकाबाई**—कांहीं नेम नाहीं सांगवत ! मोठा पराक्रम गाजविलात, नाहीं ?

**रामभाऊ**—त्या रांडेची अश्शीच कणीक नरम केली पाहिजे !

**गोविंदभटजी**—ती खरोखरच मोठी विलक्षण बाई दिसते ! तिला मधेंच कुठेंकुठें दाढीमिशा होत्या एवढ्याएवढ्याशा. निदान मलातरी असें वाटतें बुवा.

**रामभाऊ**—काय ह्मणतां ? मग तिचा पाठलाग केलाच पाहिजे. या हो मंडळी, या, आतां मात्र तुह्मांला खास मौज दाखवतों बघा.

**विनायकराव**—चला बुवा; आणखी जरासे यांच्या कलानेंच जाऊंया.

[ रामभाऊ, विनायकराव, गणपतराव, व्यंकप्पा व गोविंदभटजी जातात.

**मथुराबाई**—त्याचं अगदीं खरपूस अंग शेकलं असेल नाहीं ?

**द्वारकाबाई**—फारच बेदम पिटलं हो पण ! ज्या काठीनं एवढा प्रताप गाजविला, ती मी देव्हाऱ्यांत मांडून ठेवत्यें आतां. मथुराबाई, झाली का नाहीं पुरेशी गम्मत ? का आणखी सूड उगवायचा आहे त्याचा ? त्याची जर आणखी पाठ पुरवली, तर पदरीं दुष्टपणा येईल असं तुह्मांला वाटतं का ?

**मथुराबाई**—त्याच्या मनांतली दुष्टवासना पार जिरून गेली असेल. इतःपर तो आपल्या नादीं लागेलसं मला कांहीं वाटत नाहीं.

**द्वारकाबाई**—त्याला कसं प्रायश्चित्त भोगायला लावलं हें आतां आपल्या माणसांना सांगूं या अं ?

**मथुराबाई**—हो हो, काय हरकत आहे ? तुमच्या यजमानांच्या डोक्यांतलं किल्मिषतरी धुऊन जाईल सांगितल्यानं. मग अजूनहि त्या शिराळशेटाचा छळ करावा असं त्यांनां वाटलं, तर आपण आहोंच तयार.

**द्वारकाबाई**—ते चारचौघांत त्याची हुर्यो करतील. कध्धीं सोडणार नाहींत.

**मथुराबाई**—चला तर मग. तापल्या तव्यावर पुढले बेत ठरवून टाकूं.

[ जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—विश्रांतिभवन. त्रिंबकराव व जगन्नाथ प्रवेश करितात. ]

**जगन्नाथ**—त्या उत्तर हिंदुस्थानांतील संस्थानिकाचे लोक आपली गाडी मागत आहेत.

**त्रिंबकराव**—आणखी गाडीहि पाहिजे का? यांची उठाबस करतांकरतां नाकीं नव आले बुवा. कायरे, गाडी कशाला पाहिजे? कुठें जाण्याचा बेत आहे त्यांचा?

**जगन्नाथ**—त्यांनां रेसिडेंटसाहेबानां भेटायला जायचें आहे. खुद्द संस्थानिक परवांचे दिवशीं येणार आहेत.

**त्रिंबकराव**—रेसिडेंटसाहेबांची इतक्या गुपचूप मुलाखत घ्यायला येणारे हे संस्थानिक आहेततरी कोण बुवा? इथल्या वर्तमानपत्रांततर त्याबद्दल कांहीं उल्लेख नाहीं.

**जगन्नाथ**—दत्तकप्रकरणीं त्यांची कसलीशी भानगड आहे ह्मणतात. संस्थानिकांच्या मनांतून आपल्या राणीसाहेबांच्या बहिणीच्या मुलास दत्तक घ्यावयाचें आहे. रयतेला कांहीं हा दत्तक पसंत नाहीं. लोकांनीं गव्हर्नर साहेबांकडे अर्ज केला आहे. त्या बाबतींत ते संस्थानिक रेसिडेंटसाहेबांची मुलाखत घ्यायला येणार आहेत. संस्थानिकांची स्वारी चांगलासा बॅरिस्टर घेऊन येण्यासाठीं सध्या मुंबईस थांबली आहे. ते बहुतकरून परवां इकडे येतील ह्मणतात.

**त्रिंबकराव**—असें काय? तर मग बरीच मोठी मंडळी आहे ह्मणायची ही!

**जगन्नाथ**—मलातर बुवा ही सारी सोनेरी टोळींतील मंडळी दिसते! मग खरा प्रकार काय असेल तो असो! बोलावूं का त्यांच्या कारभारीसाहेबांनां इकडे?

**त्रिंबकराव**—तुला सारें जग तुझ्यासारखेंच दिसायचें! मूर्ख कुठला! ती बडी मंडळी आहे. त्यांनां इकडे बोलावूं नको. मीच तिकडे येतों. त्यांनां गाडी जोडून द्यायला सांगजा तूं. त्यांच्यावर कचकावून बील आकारलें ह्मणजे झालें. हा संस्थानिक येणार ह्मणून मी दुसऱ्या पुष्कळ लोकांनां आमच्या भवनांत जागा रिकामी नाहीं असें ह्मणून परत लावलें आहे. त्या सर्वांचे पैसे याच्या पासून चोपून घेतले ह्मणजे झालें. चल दाखव ते कुणीकडे आहेत तें.

[ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ**—विनायकरावांचें घर. विनायकराव, रामभाऊ, मथुराबाई, द्वारकाबाई व गोविंदभटजी बोलत बसलीं आहेत. ]

**गोविंद्भटजी**—छे बुवा ! बायकांच्या अंगांत इतकी बुद्धिमत्ता म्हणजे चाणाक्षपणा आपण कधीं पाहिला नव्हता !

**विनायकराव**—त्यानें एकदम हीं दोन्हीं पत्रें तुह्मांला पाठविलीं ?

**मथुराबाई**—अगदीं एकाच घटकेला ह्मणानात ?

**रामभाऊ**—मग कीं नाहीं, अहो राणीसरकार, आह्मी तुमची माफी मागतों अां ! इतःपर तुह्मीं कांहींहि करा, मी सूर्य थंडगार पडला असें ह्मणेन, पण तुमच्या पातिव्रत्याबद्दल म्हणून शंका घेणार नाहीं. तुमच्या सच्छीलपणाबद्दल माझी अगदीं बालंबाल खात्री होऊन चुकली आहे.

**विनायकराव**—वारे वा ! पुरे करा आतां. लगेच दुसऱ्या कडेला जाऊन भिडूं नका. घटकेंत एखाद्याचा अपमान करायला उशीर नाहीं, अन् घटकेंत त्याच्या चरणीं लोटांगणें घालायलाहि उशीर नाहीं. बरें, आपला पुढला बेत ठरवून टाकूंया अगोदर. आतां आमच्या करमणुकीसाठीं तुह्मी त्या बेवकूफाशीं आणखी एकदा संकेत ठरवा; म्हणजे त्याला चांगला कचाट्यांत गांठून त्याची यथास्थित हबेलंडी उडवूं.

**रामभाऊ**—मग त्यांनीं सांगितलेलाच कावा लढविला पाहिजे.

**विनायकराव**—तो कोणता बुवा ? 'मध्यरात्रीं पिंगलेश्वराचे देवळांत या, तिथें आह्मी भेटूं,' असा त्याला निरोप पाठवायचा, असेंच ना ? मला नाहीं वाटत तो येईलसें.

**गोविंद्भटजी**—तुह्मीं त्याला जिवंतपणींच नरकवास घडविलात, आणि त्याची पाठ मऊ करविलीत; तेव्हां त्याला अगदीं पुरी धास्ती बसून गेली असेल. त्याचा कामज्वर पार नाहींसा झाला असेल, आणि वासना मरून गेल्या असतील!

**विनायकराव**—मलासुद्धां असेंच वाटतें.

**द्वारकाबाई**—तो तिथें येईल कीं नाहीं, याची तुह्मांला काळजी नको हो ! तुम्ही त्याचा कसा काय समाचार घेणार तें कळूंद्या अगोदर. मग त्याला तिकडे हजर करण्याची कामगिरी आमच्याकडे लागली. आह्मी त्याला असा निरोप पाठवूं कीं 'आपले मनोरथ पूर्ण व्हायला घर कांहीं योग्य नाहीं. दोन वेळां खो आला. ह्मणून आतां निराळंच ठिकाण काढलं आहे. एवढं मोठं खुद्द पिंगलेश्वराचं देऊळ आहे,

इतर बारीकसारिक देवळं आहेत, ओऱ्या आहेत, गच्च्या आहेत, तिथं आपण कोणाच्या देवालाहि दिसणार नाहीं.'

**मथुराबाई**—शिवाय ती जागा नेमण्यांत आमचं आणखी एक धोरण आहे. हें पहा, बोलूनचालून ती स्मशानभूमि. तेव्हां तिथें भुतंखेतं हीं असायचींच.

**विनायकराव**—कसलीं आलीं आहेत भुतें न् खेतें?

**द्वारकाबाई**—तिथेंचतर खुबी आहे सारी. आह्मी त्याला सांगणार कीं, 'तुह्मी भुताचं सोंग घेऊन तिथें या; ह्मणजे जरी कदाचित् आमच्या माणसांच्या नाहींतर दुसऱ्या एखाद्याच्या नजरेस पडलां, तरी हें भूत आहे असंच वाटून जो तो तकडधुम पळून जाईल.' असं सांगितलं ह्मणजे तो हौसेनं भुताचा अवतार घेऊन येईल.

**विनायकराव**—धन्य आहे बुवा तुमच्या युक्तीची! असल्या थापांनीं हवातो फसेल; मग तोतर बोलूनचालून विषयांध झाला आहे. बरें समजा, तो आला, तर पुढें काय तुमचा बेत आहे?

**मथुराबाई**—तेंसुद्धां आह्मीं योजून ठेवलं आहे बरं. आपल्या कालिंदीला, तिच्या दोघीतिघी मैत्रिणींनां, अन् दुसऱ्या पांचसात पोरांनां अगदीं ऐटींत पंखबिंख लावून केश मोकळे सोडून डोक्यांवर दिवे ठेवून थेट पऱ्यांच्यासारखं नटवायचं, अन् तिथेंच आसपास ठेवायचं. मग तें भूत ऐन भरांत आलं ह्मणजे आम्हीं दोघींनीं कांहींतरी खूण करायची. त्याबरोबर पऱ्यांनीं डोक्यावरच्या दिवट्या पेटवून कांहींतरी गाणं ह्मणत चोहोंकडून धावत यायचं. त्यांनां पहातांक्षणीं भेदरल्याचं सोंग करून आह्मी पळून जात आहोंत, इतक्यांत पऱ्यांनीं त्याला वेढून टाकयचं अन् 'आमच्या पऱ्यांच्या वाटेंत तूं भूत कशाला आलास' ह्मणून त्याला विचारायचं—

**द्वारकाबाई**—अन् तो खरं सांगेपर्यंत त्याला बोचकरायचं, हातांतल्या छड्यांनीं मारायचं, अन् डोक्यावरच्या दिव्यांनीं भाजायचं—

**मथुराबाई**—अन् आपण कोण तें तो कबूल झाला ह्मणजे साऱ्यांनीं त्याच्या भोंवतीं काहूर करायचं, त्याला रगडून चिडवायचं, अन् मग सोडून द्यायचं.

**रामभाऊ**—कांहीं हरकत नाहीं. हा बेत आह्मांला अगदीं पसंत आहे. पण त्या पोरांनां चांगलें तयार केलें पाहिजे.

**गोविंदभटजी**—तें काम माझ्याकडे लागलें. मी त्यांनां टीचर करीन.

**रामभाऊ**—मग ठीक होईल बुवा! मी केंसांचे टोप आणखी पंखबिंख करायचें सामान घेऊन येतों.

**मथुराबाई**—आमच्या कालिन्दीला साऱ्या पऱ्यांची मुख्य राणी करायची. तिला पार्शिणी नेसतात तसलं गुलाबी रेशमाचं पातळ नेसवायचं, अन् अंगावर पुष्कळसे दागिने घालायचे.

**विनायकराव**—(स्वगत) व्यंकप्पा डाक्टरकडून तिला पळवून चट्दिशीं दोघांचं लग्न लावून टाकायला ही संधि फारच उत्तम आहे. (उघड) मग उशीर कां? पाठवानात त्या मुकुंदरावाकडे निरोप?

**रामभाऊ**—तो येईलच म्हणा! पण मला वाटतें विसाजीपंतांनां पुन्हा एकदा त्याच्याकडे जाऊन खात्री करून घेऊन यायला सांगावें.

**मथुराबाई**—तो येणार हो! तुम्ही आधीं पऱ्या नटवायचं साहित्य घेऊन या.

**गोविंदभटजी**—चला मीहि येतों तुमच्याबरोबर. हा मोठा साधुपणाचा डांबिसपणा होणार आहे! चलायचें ना विनायकराव?

[ रामभाऊ, विनायकराव व गोविंदभटजी जातात.

**मथुराबाई**—हूं, द्वारकाबाई, मुकुंदरावाकडे निरोप पाठवायच्या व्यवस्थेला लागा अगोदर.

**द्वारकाबाई**—ही चालल्येंच.

**मथुराबाई**—थांबा कुंकूं लावलें. (एकमेकींस कुंकूं लावल्यावर द्वारकाबाई जाते.) आतां आपण गुपचूप बोलवून आणावं सोनोपंतांनां! माझ्या मनांत त्यांनांच कालिन्दी द्यायची आहे. त्यांच्याशीं कालिंदीचं लग्न करावं ह्मणून मीं पुष्कळ हट्ट घेतला, पण कांहीं ऐकत नाहींत. बरं आहे ह्मणावं, सोनोपंतांनां जांवई करीन तरच खरी मथुराबाई नांवाची. तो व्यंकप्पा डाक्टर आहे, विद्वान आहे, हें सारं खरं, पण अगदींच गांवढळ मेला. इश्शश बाई! त्या माकडाला मी कध्धींकध्धीं नाहीं द्यायची माझ्या कालिन्दीला. ह्मणे अशा लग्नांनीं समाजांत एक मोठी थोरली सुधारणा घडून येणार! तुमची होईल ह्मणा सुधारणा, पण पोरीच्या सुखदुःखाकडे अगदींच का पहायचं नाहीं? मुलीनं लग्न सुधारणेशीं करायचं का नवऱ्याशीं करायचं? एकेकाच्या डोक्यांत काय वेड भरलेलं असतं, देव जाणे. करा ह्मणावं आतां सुधारणा! माझा हेतु तर मी पार पाडणार! [ जाते.

---

## प्रवेश ४ था.

[ स्थळ—विश्रांतिभवन. त्रिंबकराव व बाळू प्रवेश करितात. ]

**त्रिंबकराव**—कायरे ए जंगली, रानवट, अजागळ, अडाणी! काय पाहिजे तुला? बोल लवकर? सांग, आटप, कळूंदे जलदी, वेळ घालवूं नको.

**बाळू**—सायेब, मी रावसायबाकडनां आलांय. मुकुंदरावाळी कायबी पुसायचां हाय.

**त्रिंबकराव**—ती बघ त्यांची खोली, त्यांचा दिवाणखाना, त्यांचें मंदिर, त्यांचा राजवाडा. दाराशीं ठोठाव, ह्मणजे ते आपल्या सैतानी आवाजानें तुला ओ देतील. जा, ठोठाव.

**बाळू**—तेंच्या खोलीमंदी राती योक दांडगी म्हातारी गेली हाय. ती यईतवर म्यापला हतंच बसतां. खरां पुसाल तर मना तिच्याशींच गोष्ट करायची हाय.

**त्रिंबकराव**—काय? मुकुंदरावांच्या खोलींत रात्रीं एक दांडगी म्हातारी शिरली आहे ह्मणतोस? चोरबीरतर नाहींना? त्यांनां हांक मारली पाहिजे. अहो मेहेरबान, अहो मेहेरबान रावसाहेब मुकुंदराव! आपल्या तोंडाच्या अगड-बंब गुहेंतून ध्वनी निघूंद्या की? तुह्मी आहां कां नाहीं तिथें?

**मुकुंदराव**—( पडद्यांत ) कोण हांका मारित आहे तें?

**त्रिंबकराव**—आह्मींच, तुमचे दोस्त पाचारण करित आहोंत. हे पहा एक प्राणी आले आहेत विलायतेहून, आणि तुमच्या लठ्ठबाईची वाट पहात आहेत. तिला खालीं घाडून द्या पाहूं अगोदर? आमच्या भवनांत असले धंदे खपायचे नाहींत हो मेहेरबान, सांगून ठेवितों आहें. इथें एकांत चालवितां होय? (मुकुंदराव दार उघडून बाहेर येतो.) अर्रर! तुमच्या ओष्टावरचे केंस हो काय झाले मेहेरबान रावसाहेब?

**मुकुंदराव**—काय सांगावें? आमची आई वारली हो! तेव्हां सकाळच्या प्रहरीं पिंगलेश्वरावर जाऊन क्षौरबिउर उरकून आलों.

**त्रिंबकराव**—पण तुमची आई मागेंच मेली होती ना हो मेहेरबान?

**मुकुंदराव**—अहो ती सख्खी आई, आणि ही सावत्र आई. कालरात्रीं त्या बाईनें मला येऊन सांगितलें. सकाळपर्यंत ती इथें होती; पण आत्तां इतक्यांतच गेली बघा.

**बाळू**—त्या देवरुशीनबाईच आलत्या न्हाय?

**मुकुंदराव**—होय होय. त्याच आल्या होत्या. तुझें काय काम आहे त्यांच्यापाशीं ?

**बाळू**—सायेब, तिला हिकडं येताना आमच्या रावसायबांनीं बगितला. तवां, सायेब, निळू निळू कोनसा योक हाय, त्यान त्यांची घड्यालाची साकली चोरलीनशी पुसाया मला धाडलांन हाय सायेब !

**मुकुंदराव**—अस्सें का ? माझें तिच्याशीं बोलणें झालें आहे याबद्दल.

**बाळू**—मंग ती काय बोलली सायेब ?

**मुकुंदराव**—ती असें ह्मणाली कीं, ज्यानें ती सांखळी चोरली तो मोठा भामटा असला पाहिजे.

**बाळू**—ती सवतां मना भेटती ह्मंजी बरां व्हतां. तिला दिशिऱ्या गोष्टीबी पुसायच्या व्हत्या, सायेब.

**मुकुंदराव**—काय विचारायचें होतें, सांग पाहूं ?

**त्रिंबकराव**—चल, बोल लवकर ! सांग ?

**बाळू**—ते दिशिऱ्या कोनाशी बोलू नको म्हनून मला ताकीद दिलीन हाय आमच्या रावसायबांनी.

**त्रिंबकराव**—कां ? सांगतोस कां नाहीं ? तुला जीव नकोसा झाला आहे वाटतें ?

**बाळू**—सांगतां सायेब. त्या कालिंद्री का कालुंद्री बाय ह्मनून हैत ना ? त्या आमच्या रावसायबांस मिलतील कां न्हाय ह्मनून हाटकायचां व्हतां.

**मुकुंदराव**—त्याचें उत्तरदेखील मला ठाऊक आहे.

**बाळू**—काय सायेब ?

**मुकुंदराव**—बहुतकरून मिळतील; पण फारकरून नाहीं मिळायच्या. जा सांग जा आपल्या धन्याला; ह्मणावें देवऋषीणबाईनींच मला असें सांगितलें.

**बाळू**—असां कसां सांगूं सायेब ?

**मुकुंदराव**—अरे जा, तुला काय त्याचें ? सांग ह्मटलें कीं सांगावें.

**बाळू**—बरां सायेब. आमचं धनी पन ही बातमी ऐकून नाचायाच लागत्याल. [ जातो.

**त्रिंबकराव**—भले शाबास ! खूप वस्तादगिरी केलीत बुवा मेहेरबान ! पण खरेंच का, तुमच्याकडे कुणी देवऋषीण आली होती ?

**मुकुंदराव**—आली होती तर! मला जन्मांत कुणी इतकी अक्कल शिकवली नव्हती, इतकी तिनें शिकवली. मला त्याबद्दल कांहीं द्यावें न लागतां फुकट अक्कल मिळाली, इतकेंच नाहीं, तर अकलेबरोबर आणखी दक्षिणाहि मिळाली.

( जगन्नाथ प्रवेश करतो. )

**जगन्नाथ**—यजमान, सारा घात झाला पहा; घात झाला अगदीं!

**त्रिंबकराव**—कांरे बुवा? काय झालें?

**जगन्नाथ**—त्या संस्थानिकाचे लोक आपलें बिल दिल्याशिवाय गेले की?

**त्रिंबकराव**—एवढेंच ना? मीं ह्मटलें काय झालें! अरे त्यांच्या यजमानांची त्यांनां तार आली कीं, माझें येणें सध्या रहित झालें आहे, तेव्हां तुह्मीच परत निघून या ह्मणून. प्रत्यक्ष मीं ती तार वाचून पाहिली. संस्थानिक पाठोपाठ येणार होते, ह्मणून त्यांनीं अधिकउणे पैसेदेखील बरोबर आणले नव्हते. तेव्हां ते मला ह्मणाले कीं, एक पांचशें रुपये द्या; मुंबईला पोहोंचल्याबरोबर हे रुपये, आणि काय होतील ते बिलाचे पैसे, सारे तारेच्या मनीऑर्डरनें पाठवून देऊं. मग काय? एवढ्या मोठ्या माणसांनीं आपल्यापाशीं तोंड वेंगाडल्यावर त्यांनां नाहीं ह्मणायचें आहे? दिले पांचशें रुपये न् काय? ते आत्तां पाठवून देतील.

( व्यंकप्पा प्रवेश करतो. )

**व्यंकप्पा**—नमस्कार त्रिंबकराव. काय चालल आहे?

**त्रिंबकराव**—या मेहेरबान. काय नवल विशेष?

**व्यंकप्पा**—वा महाराज! तुह्माला अझून खबरीच नाही दिसत? तुमच्याकडे त्या सरदाराच्या ह्मणून कोणी माणसानी आले आहेत ना? सरदार गिरदार सार झूट आहे बगा. त्यानी सारे लुच्चा बेरकी आहे. माझ्या एका मित्रानी वाँबेहून आले आहेत; ते सांगितले कीं ते लोक सरदारगृहात काही दिवस राहून पैसा न देता पळत आले आहेत ह्मणून. मला कळल्या घटकेला धावून आलो इकडे तुह्माला यच्चरकी करायला. बगा. संभाळून असा. त्या गृहस्थानी बाहेर उभे आहेत. मी जाऊन येतों. नमस्कार.

[ जातो.

**त्रिंबकराव**—सारा घोटाळा झाला. आतां काय करावें? त्या बेरडांचा पाठलाग केला पाहिजे तावडतोब.

[ त्रिंबकराव जगन्नाथ जातात.

**मुकुंदराव**—बरें झालें, उत्तम झालें! मी फसलों आणि पिट्टी खाल्ली, तसेंच सारें जग फसायला लागलें तर मला फार आनंद होईल. छे बुवा! आह्मांला केराच्या पाटींत टाकल्याचें अन् बेदम झोडपल्याचें बिंग जर का बाहेर फुटलें, तर लोक तोंड काढूं द्यायचे नाहींत! त्याचप्रमाणें त्या दोघांच्या बायकांवर नजर ठेवल्याचें जर त्यांनां समजलें, तर ते माझी चरबी काढून आपल्या गाड्यांच्या चाकांतच घालतील. आह्मी खरेपणा सोडून देऊन लोकांच्या मुंड्या मुरगाळायला लागलों त्याच्यापासून थोडाबहुत फायदा झाला, नाहीं असें नाहीं. तरीपण एकंदरींत हालच फार झाले. मीं आपलें वर्तन अजूनहि सुधरलें असतें, पण करणार काय? तसले विचारच मनांत येत नाहींत.

( सखूबाई प्रवेश करते. )

**मुकुंदराव**—कायहो, कुठून आलांत?

**सखू**—दोघींच्याहिकडून.

**मुकुंदराव**—तर मग एकीला विहिरींत लोटा आणि दुसरीला आडांत ढकला. मीच मूर्ख, गाढव, ह्मणून त्यांच्यापायीं इतका गोत्यांत सांपडलों, आणि क्लेश भोगले.

**सखू**—मग त्यांनींदिखील नाहीं वाटतं भोगले? निदान एकीनंतरी भोगलेच भोगले. बिचाऱ्या द्वारकाबाईंची पाठ नवऱ्यानं अगदीं हिरवीनिळी करून सोडली आहे हो!

**मुकुंदराव**—अहो तुम्ही काय हिरव्यानिळ्याचें सांगतां मला? माझी स्वताची पाठतर इतकी सडकली आहे कीं, बघितल्यावर इन्द्रधनुष्यच पडलें आहे कीं काय असें तुह्मांला वाटेल. लहानपणीं नाटकांत स्त्रीपार्ट करण्याची हौस होती, ती आत्तां आपोआपच पूर्ण झाली बुवा!

**सखू**—रावसाहेब, आपल्या खाजगी खोलींत चला. मग काय काय स्थिति आहे, ती सारी आपल्याला उलगडून सांगत्यें. ती ऐकून आपल्याला खास बरं वाटेल. या पत्रावरून आपली कांहीं अंशीं कल्पना होईलच. तुमच्या इच्छा सफळ व्हायासाठीं कोण ही यातायात करावी लागत आहे मला! तुमच्यापैकीं एकानं कांहींतरी घोर पातक केलं आहे खास. त्याखेरीज तुमच्या सुखांत असं विष कालवलं जाणार नाहीं. [ जातात.

---

## प्रवेश ५ वा.

[ **स्थळ**—विश्रांतिभवनांतील दुसरी एक खोली. त्रिंबकराव, व शंकरराव बोलत बसले आहेत. ]

**त्रिंबकराव**—मला अगदीं सुचेनासें झालें आहे. कांहींकांहीं नको असें वाटतें.

**शंकरराव**—पण माझें ह्मणणेंतर ऐकून घ्याल? मला जर एवढें साह्य कराल, तर मी तुमचा जन्माचा ऋणी होऊन राहीन.

**त्रिंबकराव**—बरें बोला कायतें. मी तुम्हांला मदत जरी केली नाहीं तरी तुमचें गुपित राखीन.

**शंकरराव**—तुह्मांला माहितच आहे कीं, कालिन्दीवर माझें प्रेम आहे ह्मणून? तिचीदेखील माझ्यावर फार प्रीति असून माझ्याशीं लग्न करायला ती एकापायावर तयार आहे. हें पहा मला तिचें पत्र आलें आहे. त्याच्यांतला मजकूर असा कांहीं विलक्षण आणि मजेदार आहे कीं, तो पाहून तुह्मांला आश्चर्यच वाटेल. मुकुंदराव हा त्यांतला मुख्य विषय आहे. पण आमचाहि त्यांत इतका कांहीं निकट संबंध आहे कीं, एकाचा उल्लेख केल्यावांचून दुसऱ्याची हकीगत सांगणें शक्यच नाहीं. मौज काय आहे ती तुह्मांला सांगतों, ऐका. आज रात्रीं बारा आणि एकाच्या दरम्यान कालिन्दी परीच्या वेषांत पिंगलेश्वराच्या गच्चीवर असणार आहे. तेथें दुसरेहि कांहीं चमत्कार होणार आहेत. त्या गडबडींत व्यंकप्पानें तिला पळवून मधुपुरास न्यावी, आणि भरदिवसा तिच्याशीं लग्न लावून टाकावें, अशाबद्दल विनायकरावांनीं व्यंकप्पाला मुभा दिली आहे व तिलाहि त्याच्याबरोबर जाण्याबद्दल बजावलें आहे आणि कालिन्दीनेंहि तें कबूल केलें आहे. इकडे मथुराबाईच्या मनांत ती त्या शंखोबा सोन्याला द्यावी असें आहे. तेव्हां सगळ्या मंडळीचें लक्ष्य मुख्य गमतींत वेधलें आहे असें पाहून सोन्यानें तिला पळवावी असें मथुराबाईंनीं ठरविलें आहे. त्यांच्या लग्नाची देखील त्यांनीं कडेकोट तयारी करून ठेवली आहे. कालिन्दीनें आपल्या आईच्या म्हणण्यालाहि रुकार दिला आहे. आतां तिनें गुलाबी पोषाख घालावा असें प्रथम सर्वांचें ठरलें आहे. त्याप्रमाणें गुलाबी पोषाख पाहून व्यंकप्पानें आपला कार्यभाग साधावा, असें विनायकरावांचें आणि त्याचें ठरलें आहे. पण मथुराबाईंनीं कालिंदीला हिरवा पोषाख करायला सांगितलें आहे. आणखी, सोन्याची आणि तिची खूण पटल्यावर संधि साधून दोघांनीं बाकीच्या लोकांतून

निसटावें, आणि लागलीच डोक्यावर अक्षता पाडून घ्याव्यात, अशा प्रकारचें मथुराबाईचें कारस्थान आहे. कालिन्दीनें आईच्या ह्मणण्यालाहि कबुली दिली आहे.

**त्रिंबकराव**—मग ती फसवणार कोणाला ? बापाला का आईला ?

**शंकरराव**—दोघांनांहि फसवणार आणि माझ्याबरोबर लग्न करणार. आणि तुमची जी मला मदत पाहिजे, ती याच कामांत. तें सीमांतपूजन आणि रुखवत फिकवत जाऊंद्या कोकलत. मी तिला घेऊन आल्याबरोबर शास्त्रोक्त विवाहविधि तेवढा ताबडतोब उरकून घेतला पाहिजे. तेवढ्याची तुम्ही तरतूद ठेवाल तर आम्हां दोघांवर तुमचे फार उपकार होतील.

**त्रिंबकराव**—अहो मेहेरबान, त्यांत कसले उपकार आले आहेत ? तुह्मी अगदीं निर्धास्त असा, समजलांत ? तुमचा दोघांचा जोडा चांगला शोभेल, असें पहिल्यापासूनच माझें मत आहे; आणि ह्मणूनच मी तुमच्यासाठीं पूर्वींपासून खटपट करित आलों. त्याचप्रमाणें आतांहि करीन बरें ?

**शंकरराव**—मी तुमच्या उपकारांची अंशतःतरी फेड करीनच करीन. शिवाय तुमचा जन्माचा ऋणी होऊन राहीन.

**त्रिंबकराव**—मी तुमच्या एका पैलादेखील शिवणार नाहीं.

[ जातात.

[ पडदा पडतो. ]

## अंक ५ वा.

### प्रवेश १ ला.

[ स्थळ—विश्रांतिभवन. मुकुंदराव व सखूबाई बोलत आहेत. ]

**मुकुंदराव**—बरें, आतां जा. झाला आमचा निश्चय. मात्र इजा बिजा तशी तिजा होऊं नये, म्हणजे झालें.

**सखू**—अहो देवाचा बाप जरी उतरून आला, तरी आतां त्याच्या हातून कांहीं होणार नाहीं. बरं, मग तुम्हांला अंगाला फांसायला डांबर आणून देऊं, का तो दुसरा कसला रंग असतो तो आणून देऊं ?

**मुकुंदराव**—काय पाहिजे तें आणा हो. त्यांत काय आहे मोठेंसें ? बरें, जा आतां. (सखूबाई जाते व रामभाऊ येतात.)या, विसाजीपंत, नमस्कार. आतांमात्र तुमचें नशीब उघडायची वेळ येऊन ठेपली म्हणून समजा. उद्यां मध्यरात्रीं पिंगलेश्वराच्या देवळांत या, आणि बघा काय काय चमत्कार दृष्टीस पडतात ते.

**रामभाऊ**—ठीक आहे. पण त्या दिवशीं रात्रीं तुम्ही द्वारकाबाईकडे जाणार होतां, ते गेलां होतां कीं नाहीं ?

**मुकुंदराव**—गेलों होतों तर ? जातांना मिशांचे आंकडे मारे वरती चढवून मी मर्दाप्रमाणें ऐटींत तिच्याकडे गेलों होतों. पण परत येतांना बुवा मिशा उतरवून बायकोसारखा खालीं मान घालून परत आलों. तो म्हाद्या रामज्या शुद्ध सैतानाचा अवतार आहे बघा! संशयाचें चक्र सारखें बेट्याच्या डोक्यावर फिरत आहे. काय सांगूं विसाजीपंत तुम्हांला ? मी बायको आहें असें समजून त्यानें मला भक्कम धोपटलें बघा. पण मी बायको आहें अशी त्याची समजूत झाली, म्हणूनच त्याची छाती झाली बरें ! मी कोण होतों हें ठाऊक असतें, तर बेट्यानें धोतर नासवलें असतें. समजलांत ? मला आत्तां एका ठिकाणीं जायचें आहे. बरोबर येत असलां, तर तुम्हांला जातांजातां सारी हकीगत सांगेन. छे बुवा, विसाजीपंत, लहानपणीं आम्हीं पुष्कळ चोऱ्या केल्या, मारामाऱ्या केल्या, नाहींनाहीं तें केलें, पण कुणाकडून नुसतें हूंसुद्धां म्हणून घेतलें नव्हतें. पण या वेळीं निमूटपणें काठ्यांचे घाव सोसावे लागले. हें सारें तुमच्याकरतां बरें? विसाजीपंत, चलाच तुम्ही माझ्याबरोबर. त्या हलालखोर रामज्याच्या तुम्हांला गमतीगमती सांगतों बघा. तुम्ही पोट धरधरून हंसाल. आज रात्रीं मी पक्का त्याचा सूड घेणार आहें. चला.

[ जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**–पिंगलेश्वराचे देवळांतील चौक. विनायकराव व व्यंकप्पा प्रवेश करितात. ]

**विनायकराव**—चला, आपण या इथल्या एखाद्या ओरींत लपून बसूं. पऱ्यांचे दिवे दिसल्याबरोबर लगेच वर जातां येईल. पण हें बघा जांवईबुवा, भलतीलाच घेऊन जाऊं नका बरें का ?

**व्यंकप्पा**—मी चुकत नाहीं हो. त्याची तुह्मी अगदी काळजी सोडून सोडा. मी बरोबर कालिंदीलाच पळवून नेतों बगा.

**विनायकराव**—कोण हा अंधेर पडला आहे ! ही अगदीं भुतांच्या आणि पऱ्यांच्या संचाराला शोभेलशी वेळ आहे. चला, चला पाय उचला लौकर, तीं कोणी येताहेत इकडेच. ही ओरी वरी दिसत आहे; चला, इच्यांतच लपून बसूंया.

[ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ**–सुंदरवनांतील पिंगलेश्वराच्या टेंकडीचा रस्ता. द्वारकाबाई, मथुराबाई व सोन्या प्रवेश करतात. ]

**मथुराबाई**—हें पहा, कालिंदीचा पोषाख हिरवा आहे बरं का. ध्यानांत असूंद्या. नीट पाळत ठेवून तिला पळवा, अन् अगोदर डोक्यावर अक्षता पाडून घ्या. काय ह्मणे, मुलगी दिली तर एक त्या व्यंकप्पाला द्यायची, नाहींतर तशीच कुवारीण ठेवायची. बसा ह्मणावं आतां टाळ्या वाजवीत. मी नांवाची मथुराबाई आहें! बरं जांवईबुवा, आह्मी जातों आतां बरंका? वेळ येईपर्यंत इथंच कुठंतरी जवळ असा. हिरवा पोषाख बरं का !

**सोन्या**—तुह्मी अगदीं काळजी करूं नका ह्मो. आमचें असें ठरलें आहे कीं, मीं 'कोण' ह्मणून विचारायचें, आणि तिनें 'मी' ह्मटलें कीं तिला अचानक उचलून पसार व्हायचें.

**द्वारकाबाई**—पण हें प्रश्नोत्तर हवंच कशाला मुळीं ? हिरव्या पोषाखाची खूण पटली, कीं अलगद तिला पळवून न्यायची. हे पहा अकरा वाजले.

**सोन्या**—ठीक आहे. तसेंच करतों. [ जातो.

**मथुराबाई**—शेवटीं मीं आपलं ह्मणणं खरं केलं, याबद्दल तिकडे जितकं वाईट वाटेल,तितका कांहीं मुकुंदरावाचा फजीतवाडा उडालेला पाहून खास आनंद व्हायचा नाहीं. पण मीतरी काय करूं? त्या रानवटाशीं लग्न करून पोरीला काडीभर सुख लागायचं नाहीं, हें जर मला धडधडीत दिसत आहे, तर मी त्या गोष्टीला कशी कबूल होऊं?

**द्वारकाबाई**—बरं, कालिंदी आणि त्या बाकीच्या पऱ्या कुठं आहेत?

**मथुराबाई**—त्या किनै नदीकडच्या बाजूच्या गच्चीवर दबा धरून बसल्या असतील. त्या भुताची आणि आपली गांठ पडली कीं, त्या आपल्या दिवट्या पेटवून आल्याच ह्मणून समजा. त्या कद्धीं चुकायच्या नाहींत.

**द्वारकाबाई**—त्यांनां पाहून तो अगदीं भयानं थरथर कांपायला लागेल नाहीं?

**मथुराबाई**—नाहीं लागला तरी त्याची फजीती होणार. आणि भ्याला तर मग कांहीं विचारूंच नका. बाकी, त्याचं धाबं दणाणून जाणार नाहीं, ही गोष्टच सोडा!

**द्वारकाबाई**—आपण अगदीं खाशाच तोंडघशीं पाडणार आहों त्याला!

**मथुराबाई**—असल्या पाजी आणि हलकट लोकांनां तोंडघशीं पाडलं, नाहीं जिवानिशीं मारलं, तरी देवाच्या घरीं गुन्हा व्हायचा नाहीं.

**द्वारकाबाई**—बरं चला, वेळ जवळ येऊन ठेपली असेल.

[जातात.

---

## प्रवेश ४ था.

[ **स्थळ**—पिंगलेश्वराचें देऊळ. अस्मानी पोषाख घातलेली कालिन्दी व इतर सातआठ मुलेंमुली पऱ्यांच्या वेषांत प्रवेश करतात.]

**कालिन्दी**—चला, मंडळी लवकर चला. आपापलीं कामं नीट ध्यानांत ठेवा बरंका? चांगलं धीटपणानं वागलं पाहिजे हो? नाहींतर हें खरोखरीचंच भूत आहे असं समजून घाबरून जाल, अन् सारी घाण कराल. आज मुलींच न भितां आणि शिताफीनं आपलं काम बजावील त्याला बक्षिस मिळणार आहे, ठाऊक आहे ना? चला आतां आपल्या नेमल्या जाग्यावर.

[ जातात.

---

## प्रवेश ५ वा.

[ स्थळ—पिंगलेश्वराचे देवळांतील गच्ची. भुताचा वेष धारण केलेला मुकुंदराव प्रवेश करितो. ]

**मुकुंदराव**—हें पाहिलें! शेजारच्या गेटावरचे बारांचे ठोकेसुद्धां पडले. नि अजून कां बरें ती आली नाहीं ? जयदेवा सर्पिञ्ज्या मारुती! शनिमहाराज, काळबुवा! तुम्हां सगळ्यांची एकदम प्रार्थना करतों कीं, आतांतरी आमच्या आनंदांत विघ्न येऊं देऊं नका. काय हा मदनाचा महिमा आहे पहा ! त्यानें देवादिकांचीसुद्धां गाळण करायला सोडलें नाहीं, तो काय माणसांनां डरतो आहे ? आणखी त्यांतल्या त्यांत माझ्यासारख्या ढिल्यांच्याकडे त्याची दृष्टि फिरल्यावर मगतर कांहीं विचारायलाच नको! तो बेटा कधींकधीं पशूंनां माणसांप्रमाणें वागायला लावतो; पण बहुतकरून देवामाणसांचेच पशु बनवितो. प्रत्यक्ष इन्द्रना ? पण द्रौपदीवर वाईट दृष्टि ठेवून कावळा नाहीं का झाला ? तसाच तो विश्वामित्र. लेकाचा कुत्रा होऊन कींहो सीतेच्या मागें शेपटी हालवित गेला ! मग मी भुताचें सोंग घेऊन द्वारकेसाठीं इकडे आलों तर त्यांत नवल कसलें ? जयदेवा इन्द्रा, विश्वामित्रा, निदान तुमचीतरी माझ्यावर कृपादृष्टि असूंद्या. हें कोण ? आली वाटतें माझी प्रिया!

( द्वारकाबाई व मथुराबाई प्रवेश करतात. )

**द्वारकाबाई**—रावसाहेब, अहो भूतसाहेब ! आहां का आपण इथें ?

**मुकुंदराव**—वा,सुन्दरी,आलीस का तूं ? देवांनां म्हणावें आतां आमच्यावर पुष्पवृष्टि कांहीं नको, पण चहाची वृष्टि करा. छेः, माझ्या आनंदाची परमावधि झाली. आतां सारें जग माझ्यावर उलटलें तरी बेहत्तर!

**द्वारकाबाई**—मी आणि मथुराबाई दोघीहि आलों आहोंत.

**मुकुंदराव**—होय का ? तरमग माझ्या सुदैवाची शिकस्त झाली म्हणायची ! पण मी जर दोन असतों, तर याहून बहार उडाली असती बुवा! बरें या आतां, उशीर कां ? मला एकदा कडकडून भेट द्या पाहूं ? या या—( इतक्यांत आंत एकदम गडबड होते. )

**मथुराबाई**—अगबाई ! हा आवाज कसला बरं होत आहे !

**द्वारकाबाई**—खरोखरीचीं भुतंबितंतर नसतील ?

**मुकुंदराव**—काय भुतेंखेतें असतील म्हणतां ?

**मथुराबाई**— }
**द्वारकाबाई**— } चला बाई, पळा लौकर. [ दोघीहि पळून जातात.

**मुकुंदराव**—ही काय पंचाईत उपस्थित झाली ? मला वाटतें, माझ्या हातून पापकर्म घडलें तर मी नरकासुराची जागा बळकावीन, म्हणून तोच एक सारखा टपून बसून माझ्या या कृत्याच्या आड येत आहे.

(कालिन्दी व इतर मुलेंमुली तोंडावर मुखवटे घालून पऱ्यांच्या वेषांत येतात व मुकुंदरावास वेढतात.)

**कालिन्दी**—जमलांत काग सख्यांनों साऱ्या जणी ? चला, तुम्हांला नेमून देलें तीं तीं कामं करायला जा पाहूं ? विनते, तूं घरोघर जाऊन रात्रीचं केरपोतेरं झालेलं आहे का नाहीं तें पहा. अन् जिथं झालं नसेल तिथल्या बायकांनां यथास्थित बोचकारे अन् चिमटे घे. आम्हांला गचाळ, आळशी आणि रदाळ्या बायका मुळींच आवडत नाहींत, समजलीस ?

**मुकुंदराव**—(स्वगत)या वनदेवता आहेत, का जलदेवता आहेत, का हडळी आहेत,कोण आहेत कुणास ठाऊक! त्यांचे व्यापार कोणीं पाहूं नयेत म्हणतात. हें एक अकल्पितच विघ्न उत्पन्न झालें ! मला वाटतें, आपण कांहीं यांच्या नजरेस पडतां उपयोगी नाहीं. पण यांच्या तावडींतून निसटायचीतर मुळींच सोय नाहीं. तेव्हां आतां नशीबावर हवाला ठेवून या कोपऱ्यांतच हातपाय जुळून बसावें झालें. मग काय व्हायचें असेल तें होईल.

**विनता**—सुशीला कुठं गेली ? सुशीले, जा, आणखी ज्या ज्या मुलींनीं निजण्यापूर्वी ईश्वराचं नामस्मरण केलं असेल, त्यांनां चांगलीं स्वप्नं पाड, अन् निवांत झोंप लागूंदे. पण ज्या देवाच्या पायां पडल्याशिवाय निजल्या असतील त्यांनां झोंपेंत भेवडाव, आणखी त्यांच्या साऱ्या अंगभर चिमटे घे.

**कालिन्दी**—थोडथोड्या मिळून सगळीकडे हिंडा; आणि जिथंजिथं तुम्हांला पुण्यवान्, पापभीरु, सदाचारी, परोपकारी, स्वार्थत्यागी, ईश्वरपरायण, आणि धर्मशील असे लोक आढळतील, तिथें त्यांच्यात्यांच्या योग्यतेप्रमाणं त्यांचं कल्याण करा अन् संकटापासून त्यांचं निवारण करा. आणखी तुम्हांला जे पापिष्ठ, दुर्व्यसनी, दुष्ट, चिक्कू, आपलपोटे, स्वार्थसाधु, नास्तिक, धर्मलंड, फसवे, कृतघ्न आणि विशेषतः परस्त्रीवर पापवासना ठेवणारे आढळतील त्यांनां त्यांच्या दुर्गुणांबद्दल शासन करा आणि चांगल्या मार्गाला लावा. ज्याचे विचार वाईट, त्याचं परिणामींहि वाईटच, हें तत्व प्रत्येकाच्या मनावर बिंबवा. समजलांत ? बरं या; आधीं आपल्या नित्यक्रमाला अनुसरून इथं थोडीं गाणीं म्हणून खेळूं अन् मग आपापल्या उद्योगाला लागूं.

**सुशीला**—चला, हातांत हात घालून फेर धरा. दिवे आहेतना सगळ्यांचे पेटलेले ? हूं,—पण थांबाहो, इथं कुठंतरी मला मानवी प्राण्याचा वास येत आहे.

**मुकुंदराव**—( स्वगत ) आलीरे बुवा कांडात् व्हायची वेळ !

**विनता**—अरे मानवाच्या कारट्या ! हा कोणत्या मुहूर्तावर जन्मला होता कोण जाणे !

**कालिन्दी**—तुम्हीं आपल्या दिवट्या त्याच्या अंगाला लावून पहा बरं ? तो जर निष्कलंक असला तर त्याचा स्पर्श होतांक्षणीं त्या विझून जातील, त्याचं अंग मुळींच भाजायचं नाहीं, अन् तो मुळींच हालचाल करणार नाहीं. पण अंग पोळून जरका तो तें चुकवायला लागला, तर हा दुरात्मा आहे याबद्दल मुळींच शंका रहाणार नाहीं.

**सुशीला**—पाहूं याचं अंग पेटतं, का आपल्या दिवट्या विझतात. ( सर्व पऱ्या मुकुंदरावास भाजतात. )

**मुकुंदराव**—अग आईग, हाय्!

**कालिन्दी**—अग हा दुराचारी ग दुराचारी ! याच्या वासना खास अपवित्र आहेत. पऱ्यांनों, लागा याच्या पाठीस. याच्यावर एक निंदापर गाणं ह्मणा पाहूं ? अन् आपल्या दिवट्यांनीं याच्या अंगावर ताल धरा. किंवा त्याला चिमटे घ्या.

( सर्व पऱ्या गाणें ह्मणत असतांना मुकुंदरावास भाजतात व चिमटे घेतात. इतक्यांत व्यंकप्पा एका बाजूनें येऊन गुलाबी पोषाखाच्या एका परीस उचलून नेतो, सोन्या दुसऱ्या बाजूनें येऊन हिरव्या पोषाखाच्या एका परीस नेतो, व शंकरराव कालिंदीला पळवून नेतात. बाकीच्या पऱ्या गाणें संपल्यावर पळून जातात. मुकुंदराव वेड्यासारखा इकडेतिकडे पाहून जाऊं लागतो. इतक्यांत विनायकराव, रामभाऊ, गोविंदभटजी, मथुराबाई व द्वारकाबाई प्रवेश करतात. )

**विनायकराव**—थांबाहो रावसाहेब, जाल सावकाश ? तुम्हांला बहुरुप्याचें काम फारच बेमालुम साधतें बुवा ! ह्मातान्या देवऋषिणीचें काय, भुताचें काय! पण कायहो, भुताचें सोंग घेतल्याशिवाय तुमचा कार्यभाग साधणें शक्यच नव्हतें का ?

**मथुराबाई**—थट्टा पुरे झाली नाहीं आतां ? अहो तुह्मी गोडाजीरावसाहेब ! आतां आमच्यावर कितपत प्रेम आहे तुमचं ? हीं रावसाहेब बरं हीं ! हीं असलीं भुतं गांवातल्यापेक्षां या इथल्या नदीच्या वाळवंटांतच जास्त शोभतील !

**रामभाऊ**—कायहो फक्कड! आतां रामभ्या जारिणीपति ठरला, का रावसाहेब मुकुंद्या हरामखोर ठरला? बोला की? रावसाहेब मुकुंद्याला रामभाऊंच्या माळ्यावरचा केर, अन् हातांतल्या सोट्याची बक्षिशी, याशिवाय काय मिळालें? विसाजीपंताच्या पांचसहा विसा मिळाल्या असें तो समजत असेल; पण त्या कसच्या त्याला जिरतात? कायहो विसाजीपंत, मुकुंदराव हा ह्मशालजी आहे, नाहीं? म्हावगंड्या आहे, वडारी, धनगर आहे. झालें ह्मटलें तर महार आहे, नाहीं?

**द्वारकाबाई**—मला बाई फार वाईट वाटतं हो, रावसाहेब. आपलं नशीबच खोटं, त्याला काय करणार? माझ्या पायीं तुमच्या इतक्या हालअपेष्टा अन् मानखंडना झाली, तेव्हां तुम्ही आपले आतां माझा नादच सोडून द्या कसे? मीदिखील आतां तुमच्याशीं संबंध पुरे करत्यें. बाकी, माझं तुमच्यावर कडेलोट आणि अढळ प्रेम आहे हो!

**मुकुंदराव**—आत्तां माझ्या डोक्यांत प्रकाश पडायला लागला बरें! एकूण त्या पऱ्या नव्हेतच तर? एकदोनदा मला अशी शंकासुद्धां आली होती. पण त्यांच्या अकस्मात् येण्यानें, आणि माझें स्वताचें मन ठिकाणावर नसल्यामुळें माझ्या डोळ्यांत अगदींच धूळ पडली; आणि या खरोखरीच्याच पऱ्या आहेत, अशी माझी समजूत झाली. अकलेचा दुरुपयोग केला ह्मणजे तिचें असें चीज होतें!

**गोविंदभटजी**—मग रावसाहेब, अजूनतरी उपरति होऊंद्या, अजून रिपेंट व्हा.

**रामभाऊ**—हा तुमचा उपदेश अगदींच अनाठायीं आहे.

**गोविंदभटजी**—तर मग मी तुम्हांला सांगतों कीं, तुह्मी आपल्या संशयी स्वभावाचा डिसमिस करून टाका.

**विनायकराव**—आणखी तुह्मीं इंग्रजी भाषेची हत्या करणें सोडून द्या.

**मुकुंदराव**—इतकें उघडउघड कपट माझ्या ध्यानांत आलें नाहीं हा मोठा चमत्कार आहे बुवा! मला वाटतें, माझ्या मेंदूला दहीं अन् मीठ लावून तो उन्हांत वाळत घातलेला होता, म्हणूनच अशी फसगत झाली; आणि हीं मट्ठरगीं माझ्यापुढें आपलें पांडित्य गाजवायला लागलीं. आतां चाळणींत पाणी घालून जीवच दिला पाहिजे.

**गोविंदभटजी**—छे छे, तसें करूं नका. आधींच तुमचें पोट हजार पखालींहून मोठें आहे. त्यांत आणखी वॉटर शिरून तें ब्रेकबीक झालें, तर जलप्रलय होऊन अर्धें शहर वाहून जाईल.

**मथुराबाई**—कायहो रावसाहेब, आह्मी आपलं शील विसरूं, अन् पातिव्रत्याला हद्दपार करूं, ह्या गोष्टी तुह्मांला संभवनीयतरी कशा वाटल्या? बरं चला, कोणच्याहि का मार्गानं होईना, तुमच्यापासून आमच्या मनाला आनंद झाला खरा.

**विनायकराव**—चांगले लोक असतात ते असेच स्वतः कष्ट सोसून दुसऱ्यांनां आनंद देत असतात!

**रामभाऊ**—तें काय विचारावें? सबंध देशाच्या शाश्वतच्या कल्याणासाठीं कोणी तात्पुरती निंदा सहन करतात; कोणी सरकारच्या डोळ्यांत खुपतात; कोणी कारागृहवास भोगतात. परंतु फक्त चारपांच माणसांच्या क्षणिक करमणुकीसाठीं कचरापेटीवास भोगणारा आणि बेदम यष्टिमार खाणारा असा एकहि महात्मा भरतभूमि आजपर्यंत प्रसवली होती का?

**गोविंदभटजी**—पण लोक काय मॅड असतात पहा! अशा लोकांकडे दुर्लक्ष्य करून आपले भलत्याचींच स्मारकें करित सुटतात. असा वेडेपणा आपण तर बुवा पदरीं घेणार नाहीं. रावसाहेबांच्या पश्चात् आपण त्यांचें स्मारक करणार. रावसाहेबांचा भुताचे पाटींत पुतळा करून तो या स्मशानभूमिवर उभारूं.

**विनायकराव**—मिशा कुठें गेल्या म्हणून विचारलें तर आई मेली म्हणून सांगितलेंत नाहीं का?

**मुकुंदराव**—टोंचा बाबांनों, हव्वे तसे टोंचून खा. मी तुमच्या तावडींत सांपडलों आहें खरा! आमचा अगदीं खजुरीबोऱ्या म्हणतात, तो झाला; तेव्हां तुम्ही जें जें काय ह्मणाल तें थोडेंच आहे!

**विनायकराव**—बरें रावसाहेब, आपण झाल्या गोष्टी विसरून जाऊं, आणि पूर्ववत् मित्रत्वाच्या नात्यानें वागूं, समजलांत? याला साक्ष ह्मणून तुम्ही उद्यां दुपारीं आमच्या घरीं जेवायला या. तुमची फजिती झाली ह्मणून आमच्या राणीसाहेब तुह्माला हंसत आहेत; पण उद्यां दुपारीं फजीत होऊन त्याच खट्टू होऊन बसतील, आणि तुह्मी त्यांनां हंसाल. बरें चला आतां आपआपल्या घरीं जाऊं. उद्यां दुपारीं मात्र चुकूं नका बरें का?

**मथुराबाई**—( स्वगत ) मला शंका आहे. बघूं आतां कोण कुणाला हंसतं तें.

[ जातात.

---

## प्रवेश ९ वा.

[ स्थळ–विनायकरावांचें घर. विनायकराव, रामभाऊ, व मुकुंदराव बसले असतां व्यंकप्पा प्रवेश करतो. ]

**व्यंकप्पा**—मला फसगी घातली काय ? अय्यय्यो ! मी मुलग्याबरोबर लग्न करून घेतलो कीहो! त्यानी कालिन्दी नाहीं, काहीं नाहीं. इतका मोठा हुडगा आहे पह्य!

**विनायकराव**—कां बरें, तुह्मीं गुलाबी परीच नेलीत ना ?

**व्यंकप्पा**—गुलाबीच नेलो की ? पण त्यानीच परीचा परा झाला ! बर आहे, काहीं हरकत नाहीं, पाहून घेतो. [ जातो.

**मथुराबाई**—(प्रवेश करून) इकडे राग येईल अशी मीं एक गोष्ट केली आहे. आपला कावा माझ्या लक्ष्यांत आल्यावर मीं कालिंदीला हिरवा पोषाख करायला सांगितलं. एव्हांना विष्णुपुरास तिचं सोनोपंतांशीं लग्नसुद्धां लागून चुकलं असेल. मी खरोखरच आपली पाहिरी सोडून वागल्यें, पण इकडे माझ्यावर रागवायचं नाहीं हो ? मीं जें केलं तें केवळ पोरीच्या सुखासाठीं केलं.

**सोन्या**—( प्रवेश करून ) वाः मथुराबाई ! खूप केलीत ?

**मथुराबाई**—कांहो जांवईबुवा ? काय झालं ?

**सोन्या**—आणखी काय झालें ह्मणून विचारतां? मुलगी नाहीं, मुलगा झाला !

**मथुराबाई**—अहो, पण झालं तरी काय ? नीट सांगाल कीं नाहीं ?

**सोन्या**—आपलें ठरल्याप्रमाणें कालिन्दीला घेऊन मी रातोरात विष्णुपुरास गेलों. तिथें तिची वेणीफणी करायला ह्मणून आमच्या मामींनीं तिचे केश सोडले, तों आपला नकली केंसांचा टोप हातांत आला आणि बघतों तों ती कालिन्दी नसून मोठा थोरला हिजडा कालिंदा निघाला ! चार लोक जवळ होते, ह्मणून मला मूग गिळून बसावें लागलें; नाहींतर मीं त्याचा खूनच पाडला असता, नाहींतर त्यानेंतरी माझा पाडला असता !

**मथुराबाई**—तरमग तुह्मीं भलतीच परी उचललीत खास !

**सोन्या**—हें मोठेंच सांगितलेंत तुह्मीं ? तरी बरें, कीं हा कालिन्दा आहे ह्मणून वेळींच आमच्या ध्यानांत आलें !

**मथुराबाई**—कांहीं नाहीं, यांत तुमचीच कांहींतरी चूक आहे. कालिन्दी हिरव्या रेशमाचा पोषाख करून येणार आहे, असं मीं तुम्हांला सांगितलं होतं ना ?

**सोन्या**—नाहीं कोण ह्मणतो ? मी हिरव्या परीकडे गेलों आणखी आमचें ठरल्याप्रमाणें तिला ‘ कोण आहे ’ ह्मणून विचारलें, आणि तिनें ‘ मी आहें

ह्मणून उत्तर दिल्यावर मग तिला घेऊन गेलों. इतकेंहि करून शेवटीं आपला त्या पोष्टांतल्या बुवांचा मुलगा निघाला! तेव्हां आतां काय ह्मणावें? मला असें फसविलेंत काय? थांबा, साऱ्या गांवभर तुमची हुर्यो करतों! [जातो.

**रामभाऊ**—मोठाच चमत्कार आहे बुवा! मग खरोखरीच्या कालिन्दीचा काय पत्ता आहे?

(त्रिंबकराव व शंकरराव आणि कालिन्दी येतात. शंकरराव आणि कालिंदी उभयतां सर्वत्रांस नमस्कार करितात.)

**कालिन्दी**—आई, बाबा, आम्हांला क्षमा करा.

**विनायकराव**—काय ग ए कारटे, डाक्टरांबरोबर कां गेली नाहींस?

**मथुराबाई**—सोनोपंतांच्या बरोबर कां गेली नाहींस, बोल?

**त्रिंबकराव**—हें पहा मेहेरबान, तिला असें भंडावून सोडूं नका. काय हकीगत आहे ती मी तुम्हांला सांगतों. जीं माणसें तिला मुळींच आवडत नाहींत, इतकेंच नाहीं, तर ज्यांचा तिला मनापासून तिटकारा आहे, अशांशीं तिची जन्माची गांठ बांधायचा तुह्मीं दोघांनीं घाट घातला होता. या गोष्टी मला समजल्यानंतर ज्याच्यावर तिचें मनापासून प्रेम आहे, आणि जो तिला जिवापलीकडे मानतो, अशा या शंकररावांशीं मीं स्वताच्या जबाबदारीवर तिचें लग्न लावून टाकलें; समजलांत? या बाबतींत जो दोष द्यायचा असेल, तो मला द्या. आतां या दोघांचें वर्तन एका दृष्टीनें गैर झालें आहे, हें मीदेखील कबूल करतों. परंतु नवराबायको एकमेकांनां आवडलीं नाहींत म्हणजे त्यापासून दोघांनांहि जो त्रास होतो, आणि जे तऱ्हेतऱ्हेचे घोटाळे आणि अनर्थ होतात, त्यांच्यापेक्षां प्रथमच तुमची थोडीशी मर्जी मोडलेली चांगली, असें मी समजतों; आणि विचाराअंतीं तुह्मांलाहि मेहेरबान, असेंच वाटेल. चला आपल्या लेकीला आणि जांवयाला आशीर्वाद द्या पाहूं!

**रामभाऊ**—हें पहा विनायकराव, झालें तें झालें; आणि एका अर्थी चांगलेंच झालें. अहो, लग्नें म्हणजे ब्रह्मदेवाच्या घरच्या गांठी आहेत. त्या तोडण्याची आपण किती जरी खटपट केली, तरी जो ईश्वरी संकेत आहे त्याच्याविरुद्ध कधीं गोष्टी घडल्या आहेत का?

**मुकुंदराव**—हें बघा विनायकराव, रात्रीं तुम्ही आह्मांला फार हंसलांत ह्मणूनच आतां तुमच्यावर रडायची पाळी आली बरें?

**विनायकराव**—बरें; झालें तें उत्तमच झालें, असें समजून चाललें पाहिजे. त्यांतल्यात्यांत त्या गाढव सोन्याला जांवई ह्मणायची पाळी आली नाहीं, ह्मणून थोडेंतरी समाधान मानायला जागा आहे.

**मथुराबाई**—अन् त्या रानवट ठोंब्याबरोबर आयुष्य कंठायचं पोरीच्या नशीबांतून चुकलं, ह्मणून मलासुद्धां समाधान वाटत आहे. बरं चलायचं आतां. मघांशीं मी आल्यें ती जेवायची तयारी झाली ह्मणून सांगायला आल्यें होत्यें.

**त्रिंबकराव**—अहो वहिनी, एखाद्या कडेच्या पानापाशीं एक पाट आडवा मांडा बरेंका ? आणखी तिथें एक समई लावून ठेवा.

**मथुराबाई**—तें आतां नको सांगायला !

**रामभाऊ**—बरें, पण कायहो विनायकराव, माणसें आणि भुतें एकाच पंक्तीला बसायचीं का ?

**मुकुंदराव**—हें पहा रामभाऊ-नाहीं ह्मणतों विसाजीपंत, मीं कबूल केल्याप्रमाणें रामभाऊंच्या बायकोचा आजन्म सहवास तुम्हांला घडविलाना? मग आतां मला उगीच टोमणे कां मारतां ? नेहमीं भुतें माणसांनां पछाडतात; पण इथें आपलीं माणसेंच भुतांच्या पाठीस लागलीं आहेत ! अहो नवरदेव, ए पोरी काळुंद्री-नाहीं म्हणतों, कालिन्दी, तुह्मांला पळून जाऊन चोरून लग्न करायला सांपडावें, म्हणून मला केवढा खटाटोप करावा लागला पाहिलातना ? पैशाची मुळींच ददात नसतांना, आणखी द्वारकाबाईच्या आणि मथुराबाईच्यावर मुळींच वाईट नजर नसतांना, त्यांनां भलतींसलतीं पत्रें पाठवावीं लागलीं; स्वतः केराच्या पेटींत पडावें लागलें; पाठीवर काठीचे रपाटे घ्यावे लागले! इतकेंच नाहीं, तर एकदा स्त्रीपार्ट आणि एकदा भुताचा पार्ट करावा लागला! हें सारें तुमच्या करतां बरें ? अर्जुनसुभद्रेचा जोडा जमवितांना प्रत्यक्ष श्रीकृष्णालासुद्धां इतकें डोकें खाजवावें लागलें नसेल! मी मुकुंद म्हणजे श्रीकृष्णच तुमच्यासाठीं मुद्दाम अवतार धारण करून आलों आहें, समजलांत ? आतां या सुधारक मंडळीला माझें ह्मणणें खरें वाटायचें नाहीं; पण आपली खरोखरीची हकीगत तुह्मांला सांगितली.

**त्रिंबकराव**—भले मेहेरबान ! कमाल आहे तुमच्या डोक्याची ! तुह्मीं सांगितलेंत त्याच्यावर आमचा सर्वांचा अगदीं पूर्ण विश्वास बसला बरें ! तुह्मी म्हणतां त्याप्रमाणें तुम्ही श्रीकृष्णाचे अवतार असा, कीं भुतांच्या कोटींतले असा, परंतु तुमची गणना माणसांत नाहीं, एवढें मात्र खास !

[ समाप्तीचा पडदा पडतो. ]